
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)


महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक

वा. रा. ढवळे

वर्ष ३३ : अंक १३५ ऑक्टोबर ते डिसेंबर १९६०

या अंकांत

प्रा. वा. ल. कुलकर्णी, श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज), श्री. ना. ब. जोशी, डॉ. य. गं. लेले, प्रा. व. स. जोशी, डॉ. वा. दा. गोखले यांचे लेख व प्रा. वि. वि. पटवर्धन, प्रा. सरोजिनी कुलकर्णी, डॉ. के. ना. वाटवे, श्री. प्र. ल. गावडे, श्री. अ. ह. लिमये, प्रा. भ. श्री. पंडित, श्री. मो. रा. वाळंबे, प्रा. प्र. चिं. शेजवलकर व प्रा. रा. वि. आंतुरकर यांचीं परीक्षणें आणि परिषद्वार्ता.

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[ संपादकीयांत व्यक्त केलेलीं मतें संपादकांचीं वैयक्तिक समजावीं.]

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १३५ ऑक्टोबर—नोव्हेंबर—डिसेंबर १९६०

## संपादकीय

### कै० चिंतामण गणेश कर्वे

सुप्रसिद्ध कोशकार व महाराष्ट्र साहित्य परिषदेचे गेलीं सहा वर्षे असलेले खजिनदार श्री. चिंतोपंत कर्वे हे दि. १६ डिसेंबर १९६० रोजीं अगदी थोड्या दिवसांच्या आजारानंतर निधन पावले हें वाचून त्यांच्या परिचयांत आलेल्या कोणत्याहि व्यक्तीला हळहळ वाटल्याशिवाय राहणार नाही. इ. स. १९१९ सालीं कै. डॉ. केतकरांच्या ‘ ज्ञानकोश कार्यालयां’त त्यांनी आपल्या लेखनसंसाराला खरी सुरवात केली व पुढें त्या कोशाच्या संपादकीय कामाचीहि जबाबदारी स्वीकारून डॉ. केतकरांच्याबरोबर १९२८ सालीं ज्ञानकोशाचें काम पूर्ण केलें. ज्ञानकोशाचें संपादन करीत असतांना त्यांचें जें वाचन झालें व त्यांना जो विविध अनुभव आला त्यामुळेच, सुलभविश्वकोश, शब्दकोश, संस्कृत-इंग्लिश शब्दकोश, महाराष्ट्र-परिचय, विशाल मुंबईराज्य-परिचय इत्यादि कोशांचें संपादन गेल्या चाळीस वर्षांत ते मोठ्या समर्थतेने करूं शकले. हीं मोठ्या कष्टाचीं निकिचकटीचीं कामें करीत असतांनाच महाराष्ट्-साहित्य-परिषद्, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणें विद्यापीठ, सरस्वती मंदिर हायस्कूल इत्यादि संस्थांच्या कामांत ते अगदी आत्मीयतेने लक्ष घालीत असत. इतकेंच नव्हे तर एव्हढीं प्रचंड पसाऱ्याचीं कामें अंगावर घेऊनहि त्यांचा स्वभाव निगर्वी, गोड व मनमिळाऊ राहिला होता हें विशेष होय. त्यांची केव्हाहि भेट घ्या ते नेहमी हसतमुखच असलेले आढळून यायचे. ते सज्जन, सात्त्विक वृत्तीचे व अजात-शत्रु होते असेंच त्यांचें वर्णन करावें लागेल. महाराष्ट्र साहित्य परिषदेशीं त्यांचा इ. स. १९३१ सालापासून संबंध असून पहिलीं पांच वर्षे कार्यकारी मंडळाचे सभासद, १९३६-३७ सालीं चिटणीस व १९५४ पासून निधनाच्या दिवसापर्यंत ते खजिनदार होते. मराठी साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद दुर्दैवाने त्यांच्या वांट्यास येऊं शकलें नाही. पण त्यांनी केलेल्या प्रचंड वाङ्मयसेवेमुळे मराठींतील विद्वन्मडळांत त्यांचें नांव मोठ्या अभिमानाने घेतलें जाईल यांत शंका नाही.

अनुक्रमणिका



मृत्युसमयीं त्यांचें वय ६७ वर्षांचें होतें. पण या वयांतहि त्यांच्या कामाचा उरक विलक्षण होता. त्यांचा उत्साह तरुणांनाहि लाजविणारा होता. त्यांच्यावर अगदी अलीकडे जो पुत्रवियोगाचा जबरदस्त आघात झाला त्यामुळेच ते खचले व त्यांचें मधुमेहाचें दुखणें बळावलें. त्याच दुखण्याने त्यांचा तडकाफडकी बळी घेतला! तीन महिन्यांपूर्वीं परिषदेच्या कार्यकारी मंडाळाच्या सभेला उपस्थित असलेले चिंतोपंत कर्वे दि. ८ जानेवारींच्या कार्यकारी मंडळाच्या सभेला उपस्थित राहण्यासाठी इहलोकांतच नसावे हें दैवदुर्विलसितच नव्हे तर काय?

वा. रा. ढवळे

## महाराष्ट्र कवींचें अभिनन्दन

'पत्रिके'चा गेला अंक छापून तयार झाल्यावर महाराष्ट्र सरकारचे मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी विजयादशमीच्या सुमुहूर्तावर महाराष्ट्राचे आवडते कवि यशवंत यांची महाराष्ट्र-कवि म्हणून नेमणूक करून यथायोग्य असें मासिक वेतन देण्याची घोषणा केली. त्यामुळे यशवंतद्वयाचें अभिनंदन त्या अंकांत मी करूं शकलों नाही. कवि यशवंतांना मिळालेला हा मान त्यांच्या सतत चाळीस वर्षांच्या काव्य-सेवेचें यथायोग्य चीज करणारा जसा आहे तसाच साहित्य व कला या क्षेत्रांतील गुणी जनांचा यथायोग्य गौरव व प्रतिपाळ करणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या धोरणाचा तो प्रतीकहि आहे. त्यामुळे सरकारच्या या स्तुत्य धोरणाबद्दल त्याचें अभिनंदन करणें हें जितकें आवश्यक, तितकेंच त्या धोरणाचें पहिलें फल ज्यांना सुतराम् प्राप्त झालें त्या कविवर्य यशवंतांचेंहि अभिनन्दन करणें हें उचित होय यांत शंका नाही.

एखाद्या व्यक्तीचे ठिकठिकाणीं जाहीर सत्कार होणें हें जर ह्या व्यक्तीच्या लोकप्रियतेचें गमक समजायचें असलें तर कवि यशवंत हे अतिशय लोकप्रिय कवि आहेत हें मान्यच करावें लागेल. महाराष्ट्र-कवि ही पदवी मिळाल्यावरच त्यांचे सत्कार होत आहेत असें नसून, गतवर्षी त्यांच्या वयाला साठ वर्षे पुरीं झालीं त्यावेळींहि महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं त्यांचे सत्कार झालेले आहेत. किंबहुना त्यामुळेच यशवंतांना महाराष्ट्र-कवि हें मानाचें स्थान महाराष्ट्र-शासनाने दिलें व लोकमताची बूज राखली असें म्हणणेंच सयुक्तिक होईल. पण लोकमताची बूज राखणें हेंच एक कार्य महाराष्ट्र-शासनाने केलें असें नसून, महाराष्ट्र-कवि हें पद निर्माण करून एक चांगली प्रथा पाडली व त्या पदावर सर्वप्रथम यशवंत कवींना स्थानापन्न केलें हें सर्वथैव उचित असेंच झालें. या प्रथेबद्दल महाराष्ट्र-शासन व त्याचे प्रमुख मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांचें मी हार्दिक अभिनन्दन करतों.

## महाराष्ट्रराज्य साहित्य व संस्कृति-मंडळ

मराठी साहित्य व महाराष्ट्राची संस्कृति यांच्या जोपासनेसाठी व त्या क्षेत्रांत निर्माण होणाऱ्या अडचणी विशेषत: आर्थिक अडचणी शक्य तों दूर करण्यासाठी महाराष्ट्र-शासनाने तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेने वरील मंडळ अस्तित्वांत आणल्याबद्दल महाराष्ट्र-शासन अभिनंदनास पात्र आहे. वाङ्मयीन, सांस्कृतिक व संशोधनात्मक कार्य

योग्य मार्गानी व योग्य वळणांनी व्हावें म्हणून तें मराठी साहित्य मंडळाकडे सोपवावें व त्या कामासाठी लागणारा आवश्यक असा निधीहि त्या मंडळाकडे सोपवावा अशी सूचना मी गेल्या अंकांत केली होती. पण ती सूचना प्रसिद्ध होण्याच्या अगोदरच वरील मंडळ निर्माण करण्याचा निर्णय महाराष्ट्र-शासनाने घेतलेला होता असें दिसतें. या मंडळावर प्रा. न. र. फाटक, डॉ. घाटगे, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. गोवर्धन पारीख, म. म. प्राचार्य वा. वि. मिराशी, सेतुमाधवराव पगडी यांच्यासारखे विचारवंत विद्वान् शासनाने निवडल्यामुळे, मंडळाला वाङ्मय, संशोधन व शास्त्र या दृष्टीने प्रातिनिधिक असें स्वरूप प्राप्त झालें आहे हें खरें असलें, तरी या मंडळाने लौकरच अस्तित्वांत येणाऱ्या मराठी साहित्य महामंडळाचा वेळोवेळीं सल्ला घ्यावा व महामंडळाच्या सदस्यांशीं विचारविनिमय करून वाङ्मय, संस्कृति व संशोधन या क्षेत्रांतील योग्य अशा कार्यांना योग्य तीं अनुदानें द्यावीं असें मला वाटतें. अशा सहकार्यानेच मंडळ निर्माण करण्याचा शासनाचा मूळ हेतु सफल होऊं शकेल व कार्यालाहि गति निर्माण होईल. शासनाच्या पारंपरिक लालफिती यंत्रणेच्या चक्रव्यूहांत मंडळाचें कार्य सापडून त्याच्या गतीला खीळ बसूं नये यासाठीच मंडळाने सरकारी यंत्रणेपेक्षा थोडी निराळी अशी कांहीं स्वतंत्र व्यवस्था निर्माण करून व महाराष्ट्रांतील चार साहित्य-संस्थांच्या प्रातिनिधिक असलेल्या मराठी साहित्य महामंडळाचें सहकार्य घेऊन, साहित्य व संस्कृति-मंडळाच्या बाबतींत शासनाने संकल्पिलेलीं उद्दिष्टें पुरीं करावीं हीच सदिच्छा आहे. ● ● ●

**वा. रा. ढवळे**

---

[ पान ३८ वरून पुढे चालू ]

या लेखांत उल्लेखिलेल्या श्लोकबद्ध ग्रंथाचा समय—

**विधिसुतसुतसाक्षीपल्लवी नाम होता ।**
**निशिवरसुतवारीं श्रावणी शुद्धभूता ॥**
**वचन सुमनराशी तद्दिनीं पूर्ण झाली ।**
**अवचितसुत काशी दास साष्टांग घाली ॥**

विधिसुत = नारद त्याचा सुत = संवत्सर नामें प्लव ( पल्लव ). निशिवर = चंद्र त्याचा सुत = बुध. श्रावण शुद्धांतील बुधवार. ग्रंथाधारें प्लवनाम संवत्सर शके १५८३ व बुधवारीं प्रतिपदा व अष्टमी या तिथि येतात. शके १६४३ तहि प्लव संवत्सर आहे. परंतु कवित्व, शब्द-सौष्ठव, कल्पनाविलास व रसपरिपाक या दृष्टीनी ओवीबद्ध ग्रंथ अधिक सरस उतरला आहे. यावरून तो नंतरचा असावा व श्लोकबद्ध ग्रंथ शके १५८३ ( इ. १६६१ ) मधे लिहिला गेला असावा असें अनुमान चुकीचें ठरणार नाही.

या काव्यांतील विशेष म्हणजे सुंदर यमकें व कमलबंध, हारबंध, शेषबंध इत्यादि विविध चित्रकाव्याचे प्रकार. अशा तऱ्हेचीं संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर सर्गात्मक काव्यें मराठींत व्युत्पन्न कवींनी निर्माण केलेलीं आज उपलब्ध आहेत. पण विशेष पांडित्य अंगीं नसतांना बहुश्रुतपणाच्या बळावर एक प्रदीर्घ रसाळ काव्य रचण्याचा मान एका साध्याभोळ्या रणमर्द ‘ मराठा ’ गड्याचा आहे ही घटना संशोधनाच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. एका विशिष्ट वर्गाने मराठी वाङ्मय संपन्न केलें असें म्हणणें चुकीचें ठरेल; सर्वच ‘ मऱ्हाठा ’ वर्गाच्या ठिकाणीं महाराष्ट्र व मराठी भाषा यांबद्दल ज्वलंत अभिमान होता. यापुढील संशोधनांत याला भरपूर पुरावा मिळत जाईल अशी अपेक्षा आहे. ● ● ●

प्रा. वा. ल. कुलकर्णी

# आजची मराठी कविता

जिला आपण आजची मराठी कविता ह्या नांवाने संबोधितों तिची चाहूल साधारण १९४२–४३ सालीं लागू लागली. ती साकार होऊं लागते ना लागते तोंच तिजवर चोहो-बाजूंनी टीकेचा भडिमार झाला. तिचें स्वागत करूं पाहणाऱ्यांचा आवाज ह्या भडिमारांत जेमतेमच ऐकूं आला असावा. परंतु मौज अशी की ह्या विरोधी टीकेच्या भडिमाराचा तिजवर फारसा परिणाम होऊं शकला नाही. तिचीं पावलें पुढेपुढेच पडत गेलीं व मराठी कवितेचें रूप हां हां म्हणतां बदललें. आजची एखाद्या वाङ्मयीन नियतकालिकांतून प्रसिद्ध होणारी एखाद्या होतकरू अप्रसिद्ध कवीची कविता जरी वाचली तरी गेल्या वीस वर्षांत मराठी कवितेचा झालेला रूपपालट आंधळ्यालाहि जाणवतो. आज जेव्हा आपण ह्या कवितेसंबंधीं थोड्याफार अलिप्तपणें विचार करूं लागतों तेव्हा आपणांस काय जाणवतें ? ह्या कवितेने मराठी कवितेच्या विकासाला मदत केली काय ? तिने खरोखर काय साधलें ? जें साधलें तें काव्यदृष्ट्या मोलाचें ठरतें काय ? असे नाना प्रश्न आपल्या मनांत येतात. आज त्याच प्रश्नांचा थोडासा विचार करण्याचा प्रयत्न करूं या.

माझ्या समजुतीप्रमाणे १९४२ च्या सुमारास मराठी कवितेचा जो हळूहळू कायापालट झाला तो मराठी काव्याच्या आणि काव्यविचाराच्या दृष्टीने निःसंशय उपकारक ठरला आहे. ह्या मराठी कवितेंत घडून आलेल्या स्थित्यंतराने पुढील गोष्टी साधल्या असें मला वाटतें. त्यामुळे–

(१) कविता ही तिच्या विशुद्ध रूपाच्या अधिक जवळ सरकली. मधल्या काळांत ती ह्या रूपापासून थोडी दूर गेली होती. तिचें स्वरूप कल्पनाविस्तारात्मक, निरूपणात्मक, स्पष्टीकरणात्मक, कल्पनाचमत्कृतिजनक बनलें होतें. तिचा अवतार स्वार्थ नव्हता–परार्थ होता. त्यामुळे तिची कलात्मता कमी झाली होती. तिचें स्वरूप पसरट बनलें होतें. गेल्या पंधरा–वीस वर्षांत ती खऱ्या अर्थाने अन्तर्मुख बनली. तिचा अवतार हा स्वार्थ होऊं लागला. अनुभव हा निवेदावयाचा नसून शोधावयाचा असतो ह्याची जाण ती व्यक्त करूं लागली. ह्या दृष्टीने ती कवितेच्या विशुद्ध रूपाजवळ अधिक सरकली.

(२) खरी कविता कोणत्या रूपांत अवतरते ? ह्या प्रश्नाचा सदर कवितेने आम्हांस पुनर्विचार करावयास लाविलें. म्हणजे कवितेची भाषा ही तिच्यांतून प्रकट होऊं पाहणाऱ्या अनुभवाची भाषा कशी असते ह्याची एक नवी जाणीव तद्द्वारा आपणांस झाली. खऱ्या कवितेंतून प्रकट होणाऱ्या प्रतिमांचें स्वरूप कसें असतें ? तें अलंकारांच्यासारखें साधनरूप असतें काय ? स्पष्टीकरण, अर्थविस्तारप्रकाशन हा त्यांचा हेतु असतो काय ? त्यांची आपणांस कवितेंत स्वतंत्र जाणीव होते काय ? कवितेची चाल, तिची भाषा, तिच्यांतील प्रतिमा, तिचा छंद ह्यांची कविता वाचतांना स्वतंत्रपणें जाणीव होणें हें कशाचें लक्षण आहे ? काव्यात्मतेचें की अकाव्यात्मतेचें ? ह्या प्रश्नांचा तिने आम्हांस विचार करावयास लाविलें. त्यांचीं उत्तरें शोधण्यास मदत केली.

अनुक्रमणिका

(३) ह्या कवितेने आपणांस 'कवितेचा अर्थ' म्हणजे काय हा प्रश्न स्वतःस विचारावयास लाविलें. कवितेचा अर्थ ह्या शब्दांतील 'अर्थ' शब्दाचा अर्थ काय? चित्राचा अर्थ काय? शिल्पाचा अर्थ काय? हे तत्समान प्रश्न तिच्यामुळे विशेषत्वाने डोक्यांत घोळूं लागले. कवितेचा अन्वयार्थ आणि कवितेचा 'अर्थ' ह्यांत फरक नाही काय? ह्या 'अर्था'पर्यंत जाण्याचे मार्ग कोणते? कवितेच्या 'अर्था'कडे पोचण्याच्या ह्या वाटा ठराविक असतात काय? की प्रत्येक कविता आपणांपर्यंत कोणत्या वाटांनी पोचायचें तें स्वतःच सांगत असते? कविता ही खऱ्या अर्थाने कविता असेल तर तिचें रूपहि अनन्यसाधारणच हवें व तिच्या अंतरंगापर्यंत पोचायची किल्ली आपणांस त्यांतच शोधायला हवी. तिने तत्संबंधी दिलेल्या सूचना कान लावून ऐकायला हव्या. ही जाणीव ह्या कवितेने आपल्या मनांत प्रामुख्याने निर्माण केली. ही जाणीव नवी होती व त्या जाणिवेमुळे कवितेचा वाचक हा अधिक जागरूक, अधिक चोखंदळ, अधिक चौकस बनला.

(४) काय असेल तें असो, परंतु ह्या नव्या कवितेच्या आगमनानंतर आम्ही कवितेचा केवळ कविता ह्या दृष्टीने विचार करूं लागलों. आम्ही एखाद्या कवितेकडे पाहून स्वतःला प्रश्न विचारूं लागलों तो, ही कविता आहे? काय हा. ती सुनीत आहे की ती उद्देशिका आहे, ती जानपद-कविता आहे की निसर्ग–कविता आहे, ती मुक्तछंदांतून अवतरत आहे की जातिवृत्तांतून अवतरत आहे हे किंवा ह्यासारखे प्रश्न आपल्या मनांत येईनासे झाले. एक काळ असा होता की, कवितेकडे वळतांच हे प्रश्न आमच्या मनांत प्रथम डोकावत असत; त्यांचीच चर्चा आम्ही करीत बसत असूं; आणि मुख्य प्रश्न–ही कविता आहे काय? –हा, मला वाटतें, बाजूलाच राहत असे. आता हाच प्रश्न प्रधान बनला; इतर गौणप्रश्न उपस्थित होईनासे झाले; माझ्या दृष्टीने ह्यांतून जें साधलें गेलें तें थोडें नव्हे. असें म्हणायला हरकत नाही की ह्या गेल्या १५–२० वर्षांतील कवितेने आमचें लक्ष परत 'कविता म्हणजे काय?' ह्या महत्त्वाच्या प्रश्नाकडे वळविलें.

(५) ह्याचाच अर्थ असा की, ह्या कवितेने प्रथमच आम्हांला कवितेच्या संदर्भात विचार करितांना गौण गोष्टी कोणत्या आणि प्रधान गोष्टी कोणत्या ह्यासंबंधीचा विवेक करावयास लाविलें. 'आवश्यक' आणि 'अनावश्यक' ह्या शब्दांऐवजी आम्ही, आम्हांला न कळत, 'अपरिहार्य' आणि 'परिहार्य' हे शब्द वापरूं लागलों. अलंकरण, कल्पनाविलास, शब्दसौष्ठव इत्यादींना, कवितेचा 'कविता' ह्या दृष्टीने विचार करूं जातांच एका मर्यादेपलीकडे अर्थ नाही; कवितेचीं मूल्यें हीं नव्हेत; कवितेचीं खरीं मूल्यें ती जें व्यक्त करूं पाहत आहे, त्याला कितपत अर्थ आहे, तें एका विशिष्ट अर्थपूर्ण अनुभवाचा खास स्वतःचा असा धर्म (quality), त्याचें अनन्यसाधारण स्वरूप कितपत व्यक्त करूं शकत आहे हे किंवा ह्यासारखे प्रश्न विचारण्यामध्ये आहे, असें ह्या कवितेनेच आम्हांला शिकविलें.

(६) गेल्या पंधरावीस वर्षांत कवितेच्या विशुद्ध स्वरूपाबद्दल आपण ज्या प्रमाणांत अधिकाधिक चौकस बनत गेलों त्या प्रमाणांत आपल्या काव्यविचारांतहि अधिकाधिक निर्दोषत्व येत गेलें. कवितेसंबंधी विचार करीत असतां जो मूल्यविवेक आपल्या विचारांत येणें मधल्या काळांत थोडेंफार कठीण जात होतें व म्हणूनच आपण मूल्यामूल्यांची गल्लत करीत होतों तो मूल्यविवेक आता त्यांत येऊं लागला. ह्याचा एकंदर मराठी कवितेला निःसंशय फायदा झाला. एकच उदाहरण घ्यावयाचें म्हणजे 'गीत' ह्या कविताप्रकाराचें. ह्या कविताप्रकाराचा, त्याच्या वैशिष्ट्यपूर्ण प्रकृतीने सूचित होणाऱ्या थोड्याफार स्वतंत्र मूल्यांनी आपण अलीकडेच विचार करूं लागलों व विशुद्ध कवितेची आणि 'गीता'ची काव्यविचार करितांना गल्लत

अनुक्रमणिका

करीनासे झालों. ह्यामुळे विशुद्ध कवितेचा जसा फायदा झाला तसाच ' गीत ' ह्या कविता-प्रकाराचाहि झाला. त्याचें आगळेपण, त्याचें प्रकृतिवैशिष्ट्य, त्याचें वेगळें मूल्य, त्याची एक-प्रकारची पृथगात्मता त्यामुळेच आपल्या विशेषत्वाने लक्षांत आली; व तांबे, ना. घ. देशपांडे, बोरकर, ग. दि. माडगूळकर इत्यादींच्या काव्यनिर्मितींतील एका बहुमोल भागाचें खरें मूल्य कशांत आहे ह्याचा आपण अधिक अचूकपणें विचार करूं शकलों. गेल्या पंधरावीस वर्षांत मराठींत खऱ्याखुऱ्या विशुद्ध कवितेकडे सरकूं पाहणाऱ्या काव्यलेखनाबरोबरच लक्षणीय, श्रवणीय अशा गीतरचनेलाहि भरघोस पीक आलें तें उगीच नव्हे. वाङ्मय-मूल्य-विचार अधिक निर्दोष झाल्यास तो वाङ्मयनिर्मितीसहि परमार्थाने कसा उपकारक ठरतो ह्याचेंच हें गमक आहे. ' गीता 'च्या संदर्भातील आपला मूल्यविचार १९४० पूर्वी कोणत्या स्वरूपाचा होता, 'भावगीत' ह्या एका शब्दाने आपण एकदम कशाकशाचा विचार करीत होतों, ह्या एका शब्दांत आपण कोणकोणत्या कल्पना कोंबीत होतों ह्याचा जाणत्यांनी आपल्या मनाशीं विचार केल्यास मी जें म्हणत आहें तें लक्षांत यावें व पटावें.

सारांश, कवितेच्या संदर्भातील नानाप्रकारचे महत्त्वाचे प्रश्न ह्या आजच्या मराठी कवितेने उपस्थित केले. कित्येकांची आपणांस जणू प्रथमच जाणीव करून दिली आणि कवितेचा विचार करीत असतां आपण आतापर्यंत लक्षांत घेत असलेल्या सर्वच गोष्टींचा–अलंकार, वक्रोक्ति, शैली, छंद इत्यादि सर्वच कल्पनांचा पुनर्विचार केला. त्यांना नवा अर्थ, नवा अभिप्राय प्राप्त करून दिला. कवितेची हवा स्वच्छ करावयास ज्याप्रमाणे तिने एका मर्यादेपर्यंत मदत केली त्याचप्रमाणे काव्य-विचाराचेंहि वातावरण निर्दोष करण्यास तिने भरपूर साहाय्य केलें. हे सर्वच माझ्या समजुतीप्रमाणे आधुनिक मराठी कवितेचे आम्हांवर उपकार झाले.

परंतु ही जी कवितेकडे पाहण्याची नवी दृष्टि आम्हांस ह्या कवितेने दिली, कवितेबाबतचा जो हा अधिक निर्दोष मूल्यविचार तिने गेल्या १०–१५ वर्षांत आमच्या मनांत रुजविला त्याचाच अवलंब करून जेव्हा आपण तिच्या आजच्या रूपाकडे पाहूं लागतों तेव्हा कांही प्रश्न आपल्या डोळ्यांपुढे तरळूं लागतात. कांही शंका मनांत उपस्थित होतात.

ह्या शंका उपस्थित होणें एका दृष्टीने स्वाभाविक आहे. लेखनामधील खऱ्याखुऱ्या चैतन्यदर्शी नव्या प्रवृत्ति ह्या ज्याप्रमाणे बुरसटलेल्या वाङ्मय-विचारांवरील जळमटें झटकून टाकून त्याला उजळा देत असतात, तो अधिक निर्दोष, सकस व टोकदार करीत असतात त्याचप्रमाणे त्यांच्या मदतीने हा कात टाकून तरुण झालेला वाङ्मय-विचार आपल्या भोवतालच्या लेखनाची प्रवृत्ति काय आहे, ती वाङ्मयाच्या चैतन्ययुक्त विकासाला कितपत उपकारक आहे इत्यादि प्रश्न उपस्थित करून लेखनाची हवाहि विशुद्ध राखण्याचा आपल्या परीने प्रयत्न करीत असतो. त्याच दृष्टीने आजच्या कवितेने लक्षांत आणून दिलेलीं कवितेचीं खरीखुरीं मूल्यें तिच्या अत्याधुनिक रूपांत कितपत सापडतात हा विचार निश्चित करावासा वाटतो व तो करूं जातांच पुढील शंका डोळ्यांपुढे तरळूं लागतात.

( १ ) आजची कविता ही मूलत: स्वार्थ आहे हें खरें. तिचा अवतार मुख्यत: स्वानुभवाचें रूप शोधण्यासाठी आहे हेंहि खरें. परंतु तिजकडे पाहून पुष्कळदा असें वाटतें की, हा शोध अनुभवाला अनुभवत्व येण्याच्या अगोदरच तर सुरू होत नसावाना ? अनुभवाला अनुभवत्व येणें म्हणजे काय ? ह्या प्रश्नाचें उत्तर देणें सोपें नसलें तरी एवढें खरें की, खऱ्या कवितेंत अनुभव हा अर्थवान् झालेला असतो. तो लक्षणीय व मननीय अर्थाचें ऐश्वर्य जणू आपल्याबरोबर घेऊन येत असतो. त्यामुळेच त्याचें अनन्यसाधारणत्व, त्याची इतर तत्सम अनुभवांपासूनची अर्थपूर्ण वेगळीक आपणांस सतत जाणवत

असते. प्रत्येक व्यक्त होऊं पाहणाऱ्या अनुभवाच्या ठिकाणीं हा धर्म अपेक्षित असतो. आजच्या बहुसंख्य कवितेंतून जाणवते ती केवळ कांहीं संवेदनांची चाहूल. ह्या संवेदनांना अर्थ देणारें अनुभवत्व नव्हे. त्यामुळे आजच्या पुष्कळशा कवितांची स्थिति रेषा आहेत, टिंबें आहेत, रंग आहेत, परंतु चित्र नाहीं ह्यासारखी होतांना दिसते. ज्याला आपण अनुभव म्हणतों तो खरोखरच अनुभवत्व पावला आहे की नाही ह्याची चौकशी करायला आजच्या अनेक कवींना वेळच नसावा की काय अशी स्वाभाविकच शंका येते.

( २ ) ही शंका ज्याप्रमाणे मनांत येते त्याचप्रमाणे पुष्कळदा असेंहि वाटतें की, हे कवि जिला आपली कविता समजतात ती निखालस आपलीच आहे की नाही ह्याविषयी त्यांच्या मनांत जेवढी साशंकता असायला हवी तेवढी दिसत नाही. ते बुद्धिपुरस्सर कांहीं विशिष्ट अभिव्यक्ति-पद्धतींचें अनुकरण करतात असें नव्हे, तर ह्या अभिव्यक्ति-पद्धति त्यांच्या एवढ्या अंगवळणीं पडून गेल्यासारख्या वाटतात की त्यांखेरीज आपल्या कवितेस अन्य तऱ्हेने बोलतांच येत नाही हें त्यांच्या लक्षांतहि आलेलें दिसत नाही. मला वाटतें प्रत्यक्ष कल्पना-चौर्याच्या प्रवृत्तीपेक्षाहि ही प्रवृत्ति अधिक घातक आहे. एखाद्याने सतत न कळत दुसऱ्याची भाषा बोलावी; त्याला आपली स्वतःची भाषा सापडूंच नये हें स्वत्वशून्यतेचें लक्षण आहे. आजच्या पुष्कळशा कवितेला तिची स्वतःची भाषा सापडलेली मला तरी दिसत नाही. ती अवतरते ती मर्ढेकरांच्या भाषेंत, रेग्यांच्या भाषेंत, करंदीकरांच्या भाषेंत, किंवा पाडगांवकर-बापटांच्या भाषेंत. हें कशाचें चिन्ह आहे ?

( ३ ) म्हणूनच आजच्या बहुसंख्य कवितांचा तोंडवळा एकसारखाच भासूं लागला आहे. एकीपासून दुसरी वेगळी करण्याइतकें प्रत्येकीचें प्रकृतिवैशिष्ट्य क्वचितच जाणवत आहे. कवितांच्या खाली मुद्रित केलेल्या कवींच्या नांवांवरून त्या वेगवेगळ्या कवींच्या आहेत ह्याची खात्री पटत असली तरी प्रत्यक्षपणें त्यांच्यामध्ये त्यांचें स्वतःचें असें वेगळेपण क्वचितच आढळत आहे. एवढेंच नव्हे तर, कांही प्रथितयश कवींच्या कवितांचा तोंडवळाहि एकमेकींच्या तोंडवळ्यासारखा दिसूं लागला आहे.

( ४ ) ह्याचाच अर्थ असा की, अनुभव घेण्याच्या व ते व्यक्त करण्याच्या पद्धतींत एकप्रकारचा साचेबंदपणा येऊं पाहत आहे. हा साचेबंदपणा चरणांच्या लांबीरुंदीपासून अगदी वृत्तयोजनेपर्यंतहि जाणवूं लागला असून शब्दांची मोडणी, कल्पनांची मांडणी, प्रतिमांची गुंफण ह्यांतहि एकसारखेपणा येतो आहे.

( ५ ) म्हणजे एकप्रकारच्या ' कल्पनाचमत्कृती ' लाच कविता समजण्याचा प्रयत्न परत कविवर्गाकडून होऊं लागलेला दिसत आहे. कवितांमधून होणारा शब्दांचा विशिष्ट प्रकारें उपयोग व कल्पनांचे व प्रतिमांचे विशिष्ट प्रकारचे न्यास हाच समज उत्पन्न करीत आहेत. ह्या ' कल्पनाचमत्कृतिपूर्ण ' रचनेचें स्वरूप रविकिरणी कल्पनाचमत्कृतिपूर्ण रचनेहून भिन्न असलें तरी कल्पनाचमत्कृतीच्या ठिकाणीं असणारी बनावट, सजावट, कृत्रिमता, खोटी परिणामकारकता येथेहि निःसंशय जाणवूं लागली आहे.

( ६ ) ' मॅनर ' ही ' मॅनेरिझम् ' होऊं लागली आहे. ह्याचा अर्थ असा की, कवितेला जें प्रथम नवरूप आलें तें जरी एकप्रकारच्या अपरिहार्यतेंतून व जीवनावश्यक गरजेंतून जन्माला आल्याचें जाणवलेलें असलें तरी तिच्या आजच्या रूपांत ही अपरिहार्यता जाणवत नाही. जें अर्थपूर्ण हवें ती एक अर्थशून्य लकब होते. जें कलार्थाने साभिप्राय हवें तें केवळ सांकेतिक बनतें. म्हणूनच तिच्या प्रांतांत अनुभूतीचे, अभिव्यक्तीचे, कल्पनाचित्रांबाबतचे कांही संकेत जन्माला आल्यासारखे दिसतात. कांही विशिष्ट आकृतिबंधच ती एकसारखे निर्माण

करूं पाहते व त्यामुळेच ती निःसत्त्व भासते. तिच्यावर कवीच्या आत्मनिष्ठेचा जसा ठसा उमटलेला आढळत नाही तसाच तद्वारा कांही वैशिष्ट्यपूर्ण अनुभव व्यक्त होत आहेत ह्याचाहि प्रत्यय येत नाही.

( ७ ) काव्यात्मता म्हणजे काय हें नक्की सांगणें कठीण असलें तरी खोटी काव्यात्मता ( Pseudo-lyricism ) रसिकांना बोचल्याशिवाय राहत नाही. आज बरीचशी प्रेमकविता व निसर्गकविता लिहिली जात आहे. ह्या कवितेमधून व्यक्त होऊं पाहणारे भावानुभव नाजूकपणें नटवण्याचा, सजवण्याचा, त्यांना अत्याधुनिक रूपें देण्याचा, ' स्टायलिश ' करण्याचा जेव्हा जेव्हा प्रयत्न होतांना दिसतो—आणि तो निःसंशय भरपूर होतो—तेव्हा तेव्हा ही आभासात्मक काव्यात्मता विशेषच जाणवते. अशा खोट्या काव्यात्मतेचें प्रमाण आज एकसारखें वाढत आहे.

( ८ ) श्रेष्ठ विचारानुभवांतून प्रकट झालेली कविता आज क्वचितच वाचावयास मिळत आहे अशी रसिकांची तक्रार आहे. विचारानुभव म्हणजे तार्किक चर्चा नव्हे किंवा तऱ्हेवाईकपणें व्यक्त केलेले विचारहि नव्हेत. ही एक विचारगर्भ अशी जीवनाची जाणीव आहे. विचारगर्भ खरी परंतु ती जीवनव्यवहारांचा अर्थ लक्षांत घेणारी साक्षात्कारी अनुभूति आहे. जी अर्थगर्भ आहे, जी बरीच समावेशक आहे, जी परमार्थाने संस्कृतिटीका आहे, जिने रसिक अंतर्मुख बनतो अशी ती जाणीव आहे. हिचा अभाव आजच्या कवितेंत परत जाणवूं लागला आहे. ह्याचें कारण काय ? काव्यात्मतेचा आभास निर्माण झाला की काव्यलेखनाचें सार्थक झालें हा विचार तर ह्या गोष्टीला थोडाफार जबाबदार नाही ना ?

( ९ ) ' छंद ' ने एक-दोन वर्षांपूर्वी प्रदीर्घ चिंतनात्मक कवितेकरिता एक पारितोषिक जाहीर केलें होतें; परंतु त्या पारितोषिकासाठी आलेल्या कवितांची संख्या ६-७ वर गेली नाही. हें कशाचें द्योतक आहे ? खऱ्याखुऱ्या चिंतनशील प्रतिभेच्या अभावाचेंच हें निदर्शक नव्हे काय ? आज प्रसिद्ध होत असलेल्या कवितांमध्येहि अशा प्रदीर्घ चिंतनात्मक कवितांचा अभावच जाणवत आहे. ज्यांच्याकडून त्यांची अपेक्षा करावयाची तेहि त्यांकडे क्वचितच वळत आहेत. प्रदीर्घ चिंतनात्मक कवितांना जन्म देऊं पाहणाऱ्या जीवनानुभूतीचा तुटवडा ह्यांतून जाणवत नाही काय ? खरोखरच आजचें जीवनच असें बनलें आहे काय की ज्यामुळे तत्संबंधीचें प्रदीर्घ चिंतन अनावश्यक ठरावें ?

ह्यांतील कांही शंका मी ' छंद ' च्या १९५६ मधील शिशिर अंकांतील संपादकीयांतून रसिकांपुढे मांडल्या होत्या. आज त्यांत आणखी कांहींची भर घालून मी त्या आपणांसमोर ठेवीत आहें. ह्या सर्वच शंका गेल्या पंधरा-वीस वर्षांतील नवलेखनामुळे उजळून निघालेल्या नव्या वाङ्मयविचारांतून जन्माला आलेल्या आहेत. त्यांच्यामागे खऱ्याखुऱ्या चैतन्ययुक्त नवलेखनाबद्दलची आस्था आहे. कालच्या नवलेखनाने आजच्या व उद्याच्या लेखनाबद्दल आमच्या मनांत अपेक्षा निर्माण केल्या आहेत. ह्या लेखनाने आमच्या मनांत तकलादुपणाची, खोट्या कारागिरीची, रंगरोगणाची, कल्पनाचमत्कृतिबाबतची—सारांश, काव्यात्मतेचा आभास निर्माण करूं पाहणाऱ्या सर्वच गोष्टींची नावड उत्पन्न केली. तिच्याच पोटीं वाङ्मयासंबंधीच्या नव्या अपेक्षा, नव्या आकांक्षा निर्माण झाल्या. त्या अपेक्षा आजचें कवितालेखन पूर्ण करीत आहे काय हा प्रश्न आहे. ● ● ●

( नांदेड येथे १९-२० नोव्हेंबर १९६० रोजीं भरलेल्या पहिल्या मराठवाडा कवि-संमेलनांतील ' आजची मराठी कविता ' ह्या विषयावर झालेल्या परिसंवादांत अध्यक्षपदावरून वाचलेलें टिपण, थोड्या विस्तृत स्वरूपांत. )

श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज)

# साहित्यांतील आग्रह आणि दुराग्रह*

साहित्यांत सध्या व्यक्त होणाऱ्या कांही आग्रहांसंबंधी, दुराग्रहांसंबंधी, कांही विचार मी संक्षेपानं मांडणार आहें. वाङ्मयाला चहूकडून कुंपण घालण्याचा प्रयत्न सध्या जेवढा होत आहे, तेवढा पूर्वी कधी झाला असेल असं वाटत नाही. साहित्याचं स्वरूप कसं आहे आणि कसं असावं याची मीमांसा जाणत्यांनी अवश्य करावी. समृद्ध टीकावाङ्मय साहित्यांत कस निर्माण करतं, त्याच्या विकासाला साहाय्य करतं, आणि श्रेष्ठ प्रतीच्या रसिकतेची जोपासना करतं. परंतु हें सारं मान्य करून सुद्धा एक गोष्ट निर्विवाद आहे. जेव्हा साहित्यामध्ये टीका ही वाजवीपेक्षा अधिक प्रभावी होते, आणि टीकाकारांच्या तोंडाकडे पाहून लेखकलोक लाचारीनं आपली लेखणी चालवूं लागतात, तेव्हा साहित्याचं स्वरूप क्षीण आणि संकुचित झाल्यावाचून राहत नाही. कारण अखेरतः वाङ्मय ही एक निर्मिति आहे आणि टीका हें विवेचन आहे. टीका ही वाङ्मयाच्या अनुरोधानं निर्माण व्हावयाला हवी. जेव्हा ही परिस्थिति बदलते आणि वाङ्मय हें टीकेच्या अनुरोधानं उत्पन्न होऊं लागतं, मी असं लिहिलं तर मीमांसाकार काय म्हणतील हा प्रश्न जेव्हा लेखकांना भेडसावूं लागतो, प्रचलित मतांशीं सोयरीक जमविण्यासाठी कलाकार जेव्हा आपल्या कृतीचं केवळ लेखन नव्हे तर संपादनहि करूं लागतात, तेव्हा साहित्याची प्रगति खुंटते असं मानायला मुळीच प्रत्यवाय नाही. सध्या असं होत आहे काय ? मला वाटतं, साहित्यसृष्टींतील व्यवहारांचा आपण जरा बारकाईनं कानोसा घेतला तर या प्रश्नाचं उत्तर आपल्याला होकारार्थी द्यावं लागेल. स्वतः ललितसाहित्य निर्माण करणारे अग्रेसर लेखक जेव्हा आपल्या विशिष्ट मतांचा अभिनिवेशानं उच्चार करूं लागतात तेव्हा तर ही परिस्थिति अधिकच भयावह होते. त्यांच्या स्वतःच्या लेखनावरतीच या मतांचं बंधन पडूं लागतं. अपरिहार्यपणानं त्याच्या निर्मितीची कक्षा संकोच पावूं लागते. आपलं व्यासपीठावरील व्याख्यान आणि मेजावरील लेखन यांत सुसंगति राखण्याचा तो मुद्दाम प्रयत्न करूं लागतो, आणि अखेरीं एखाद्या मतवादाच्या सिद्धतेसाठी रचलेलीं उदाहरणं असं त्याच्या लेखनाचं स्वरूप होतं— निदान होण्याची शक्यता असते. अलीकडच्या काळांतील कित्येक कविता, चांगल्या प्रतिभाशाली कवींनी लिहिलेल्या कविता देखील, या विधानाची साक्ष पटवतील असं मला वाटतं. त्या कविता वाचल्यावर, कवितेंत कवीला काय म्हणायचं आहे हें आपल्या लक्षांत येत नाही; पण एकंदर कवितेसंबंधी त्याचा पक्ष कोणता आहे हें मात्र चटकन् ध्यानांत येतं. हा झाला स्वतः लेखकावर होणारा परिणाम. परंतु एवढ्यावरच हें प्रकरण संपत नाही. लेखक प्रतिष्ठित आणि कीर्तिवंत असेल तर त्याचा मागोसा घेत येणाऱ्या नवीन, संस्कारावस्थेंत असलेल्या, उमलूं पाहणाऱ्या पण अद्याप न उमललेल्या कलाकारांवरहि त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. स्वतःच्या अनुभवांना त्या विशिष्ट मतवादाच्या मुशींत ठोकून, कातरून बसवि-

---

* मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ६२ व्या वार्षिकोत्सवाच्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्याने दि. ३० डिसेंबर १९६० रोजीं केलेलें भाषण.



अनुक्रमणिका

ण्याचा ते प्रयत्न करतात आणि शेवटीं आपली कलाकृति निरर्थक किंवा हास्यास्पद करण्यांत यश मिळवितात. हा अनपेक्षित परिणाम लक्षांत आला म्हणजे शोक करण्याचा प्रसंग येऊन ठेपतो. पण त्यावरहि उपाय असतो. पृथ्वीवरच्या सामान्य रसिकांपासून सुमारें दोन मैल उंचीवरील हवेंत, त्यांच्या गुरूंनी आणि परात्परगुरूंनी जीं सिंहासनं निर्माण करून ठेवलेलीं असतात, त्यांवर ते आरूढ होतात आणि मातींत पाय रोवून बसलेल्या प्राकृत लोकांना—हें तुमच्यासाठी नाही, हें आमचं आणि केवळ आमच्यासाठीच आहे असा तेजस्वी जबाब देतात. पण असेहि कित्येक असतात की ज्यांचं दिल इतकं पक्कं असत नाही. ते बिचारे प्रामाणिकपणानं कांहीतरी लिहितात आणि आपल्याला तसं लिहणं जमत नाही या विचारानं दुःखीकष्टी होतात. इतिहासामध्ये कांही लोकविलक्षण मजेदार दुःखांचीं उदाहरणं नमूद झालेलीं आहेत. जामदारखान्यांतील अमाप भांडाराकडे पाहून याचं आपल्यामागं काय होणार म्हणून शोक करणारा राजा आपल्याला माहीत आहे. सर्व जग पादाक्रांत केल्यावर आपल्या तलवारीला आता उद्योग राहिला नाही म्हणून आसवं गाळणारा शिकंदरहि आपल्या परिचयाचा आहे. पोटांत गेलेली दारू डोक्यापर्यंत चढत नाही म्हणून आक्रोश करणारे मदिराभक्त आपण नाटकांत पाहिले आहेत. मला भेटलेल्या एका तरुण, नवीन कवीचं दुःख असंच चमत्कारिक होतं. स्वतःच्या कांही कविता त्यानं मला वाचून दाखविल्या. साध्या सरळ कविता होत्या त्या. पण चांगल्या काव्यलेखनाची त्यांत शक्यता दिसत होती. मी त्याला तसं सांगितलं. माझी कल्पना होती की, ह्या अभिप्रायानं तो संतुष्ट होईल. पण तसं कांहीच चिन्ह दिसलं नाही. राजसंन्यासांतील संभाजीप्रमाणे एक भकास हास्य करून तो म्हणाला— तुम्ही असं म्हणावं हें ठीकच आहे, पण या कविता अगदी टाकाऊ आहेत. असंच लिहीत राहिलों तर मी कधींच चांगला कवि होणार नाही. त्यानंतर त्याने जें खुलासेवार भाषण केलं त्याचा इत्यर्थ असा की, आपल्या प्रत्येक काव्याच्या प्रत्येक ओळींतून कांही ना कांही अर्थ निष्पन्न होतो याचं तीव्र दुःख त्याला वाटत होतं. हा एकच नव्हे, आज अनेक लहानमोठे कवि या किंवा अशा दुःखांच्या लाटेंत सापडले आहेत. हा उत्पात काव्याच्याच प्रांतांत आहे असं नाही. कथा, कादंबरी, नाट्य, निबंध ह्या क्षेत्रांतहि तो कमीअधिक प्रमाणांत दिसून येतो. काव्य दुर्बोध असायला हवं, कथा विश्लेषणात्मक असायला हवी, कादंबरी लैंगिक असायला हवी, नाटक काव्यशून्य आणि त्रोटक असायला हवं, अशा कितीतरी विचित्र दुराग्रहांची वर्दळ सध्या साहित्यांत चालली आहे. ही परिस्थिति आपल्याकडेच आहे असं नाही. पाश्चिमात्य वाङ्मयांतील तिचं स्वरूप तर याहूनहि अधिक प्रखर आहे. परंतु जेथे साहित्याच्या चतुःसीमा खूप विस्तृत असतात तेथे अशा आग्रही एकांतिक मतांचा परिणाम फारसा विघातक होत नाही. भोपाळच्या तलावांत एखादा हत्ती उतरला तर साऱ्या पाण्याला त्याची वार्ताहि लागायची नाही, पण आमच्या नाशिकच्या रामकुंडांत त्यानं स्नान करावयाचं ठरवलं तर त्या लहानशा कुंडांत हत्तीशिवाय दुसरं कांहीच शिल्लक राहणार नाही. मराठी साहित्याचा विस्तार सर्व दृष्टींनी फार तोकडा आहे आणि म्हणून अशा दुराग्रहांचा परिणाम येथे तीव्रतेनं जाणवतो; लेखकांना आणि वाचकांनाहि.

या सर्व दुराग्रहांच्या मुळांशीं एक समान प्रवृत्ति सर्वत्र दिसून येते, आणि ती म्हणजे जें सामान्य आहे, लौकिक आहे त्यापासून दूर जाण्याची आणि अलिप्ततेच्या अंधेऱ्या अरुंद गुहेमध्ये स्वतःला कोंडून घेण्याची. आपल्या अंगावरील लक्तरं स्वतःपासून लपवीत, धुळीनं माखलेल्या स्वतःच्या पायांचा शरमिंद्या नजरेनं धिक्कार करीत, ही उच्चभ्रू कलावंतांची सारी यात्रा असामान्यतेच्या शोधासाठी वाटचाल करीत आहे. स्वतःला फसवीत आणि दुसऱ्यांनाहि. साहित्य हें मुळांतच असामान्य असतं आणि साहित्यिक हा साहित्याची निर्मिति

करीत असतांना सामान्याच्या कक्षेबाहेर जात असतो. परंतु प्रतिभेची असामान्यता वेगळी आणि प्रवृत्तीची वेगळी. सध्या शोध चाललेला दिसतो तो या दुसऱ्या असामान्यतेचा, म्हणजेच झोकदार अलिप्ततेचा. जुनी समाजरचना आज सर्वत्र ढासळून पडत आहे आणि पुढे जें येणार आहे त्याची रूपरेषा अद्याप स्पष्ट झालेली नाही. कदाचित् या अनिश्चित परिस्थितीमधून ही अगतिक भ्रांत अवस्था निर्माण झाली असेल. कदाचित् दीड-दोन तपांपूर्वी जें आग्रहानं म्हटलं जात होतं त्याची ही प्रतिक्रिया असेल. कदाचित् नव्या परिस्थितीच्या दाबाखाली भरडून जाणाऱ्या जुन्या जखमी श्रद्धांचा हा आविर्भाव असेल. कारण कोणतंहि असो, साहित्यिक हा दुर्बोधतेच्या आतिरेकी विश्लेषणाच्या, विकृत आत्मनिष्ठेच्या आणि पढीक पांडित्याच्या कैदखान्यांत स्वत:ला बांधून ठेवीत आहे हें मात्र खरं. आज आपल्या साहित्यांत सामाजिक जीवनांतून निष्पन्न होणारं वैफल्य हें एक अत्यंत लोकप्रिय आणि चलनी नाणं आहे. किंबहुना तेंच एक चलनी नाणं आहे. इतर नाणीं बाजारांत दिसतां कामा नयेत असा आमच्या वाङ्मयांतील नबाबांचा आग्रह आणि आदेशहि आहे. सर्व समाजामध्ये आज वैफल्यच भरून राहिलें आहे काय? गिरगावांतील चाळींत, डेक्कन जिमखान्यावरील बंगल्यांत किंवा नासिक-नगरच्या जुन्या वाड्यांमधून तें कदाचित् असेलहि. बदललेल्या परिस्थितीचा पहिला जबरदस्त आघात आमच्या पांढरपेशा मध्यमवर्गावर झाला आहे यांत शंका नाही. पण या वर्गापलीकडचं जग साहित्यिकाच्या दिव्यदर्शी प्रतिभेलाहि दिसायला नको काय? हजारो वर्षे अज्ञानाच्या, जातिभेदाच्या आणि दारिद्र्याच्या खाईत बेशुद्धावस्थेत पडलेला समाज आपले हातपाय हालवूं लागला आहे. जें आपलं हक्काचं आहे तें घेण्यासाठी उठून उभं राहण्याची धडपड करूं लागला आहे. नव्या जाणिवांनी, आकांक्षांनी आणि अहंकारानंहि, निपचित पडलेल्या मनांत नवीन चैतन्य निर्माण केलं आहे. एक–दीड रुपयाचं तिकीट काढून आपण शहराच्या पंचक्रोशीबाहेर गेलों तर, नव्या जीवनाचे हे कितीतरी हिरवे गर्द अंकुर तेथे उमलतांना आपल्याला दिसून येतील. सत्तेच्या संपर्कानं का होईना, पण माणसांना आपल्या माणूसपणाचा शोध लागत आहे. आपलं उद्ध्वस्त जीवन संघटित, संपन्न आणि सुसंस्कृत करण्याचा विराट् प्रयत्न तेथे सुरू झाला आहे. या घडामोडींची वार्ता आमच्या वाङ्मयाला लागली आहे काय? हें सारं कांही वाङ्मयांत आणि तेंहि सर्व वाङ्मयांत आलं पाहिजे असं मी मुळीच म्हणणार नाही. कोणतीहि सामाजिक प्रतिक्रिया वाङ्मयांत यायची असेल तर ती वैफल्याच्या स्वरूपाचीच असायला हवी, असा जो आग्रह प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें वैफल्याच्या ठेकेदारांकडून केला जातो, तो वास्तवाशीं सुसंगत नाही एवढंच मला सांगायचं आहे. असे तिरसट, कडवट आणि सहानुभूतीशून्य उद्गार ज्यांत आहेत तेंच उत्स्फूर्त प्रामाणिक काव्य, बाकी सारं बनावट असा त्यांचा दावा. शिव्याशापांचा वर्षाव करीत कोणी रडारड केली तर तें विशुद्ध वाङ्मयाचं सर्वोच्च स्वरूप, आणि कोणी आपल्या लेखनांतून एखादी प्रागतिक, राष्ट्रीय अथवा दलितांसंबंधी सहानुभाव प्रकट करणारी भावना मांडली तर तें मात्र प्रचारी थाटाचं, आक्रस्ताळीपणाचं, कृत्रिम इत्यादि. प्रचार ही वस्तु तर आजच्या आमच्या सोवळ्या साहित्यांत फारच भयानक मानली जाते. सोमलवचनागासारख्या जालीम विखारांची कळा आज त्या गरीबबिचाऱ्या शब्दाला प्राप्त झाली आहे. अमुक लेखक प्रचारक आहे अशी एक शिवी हासडली की आणखी शिव्या देण्याची आवश्यकताच राहत नाही. साऱ्या शिव्या त्यांत समाविष्ट आहेत. ही प्रचारविरोधी मोहीम सध्या इतकी जोरांत आणि सार्वत्रिक आहे की लेखक आणि कवि, आपल्या साहित्यांतून कांही प्रचार होतो की काय, या शंकेनं नेहमी धास्तावलेले असतात. अभावितपणाने प्रचारात्मक लेखन करणारे लेखकसुद्धा

आपल्या टीकालेखांतून आणि प्रस्तावनांतून, मी तसा नाही– मी तसा नाही– असं आवर्जून सांगत असतात. इतका दारुण परिणाम या मोहिमेचा आमच्या मनावर आणि लेखनावर झाला आहे. अशा परिस्थितींत आम्ही प्रचारकच आहोंत असं ठासून सांगणाऱ्या लेखकांना, साहित्यनगरीच्या वेशींतून हे देवडीवाले आंत तरी येऊं देतील काय ? आधुनिक मराठी काव्याचे कुलगुरु–केशवसुत हे पन्नास वर्षांपूर्वीच आपला अवतार संपवून गेले म्हणून निभावले. आज ते हयात असते आणि आपल्या 'तुतारी,' 'नवा शिपाई,' 'मजुरावर उपासमारीची पाळी,' यांसारख्या कविता घेऊन ते साहित्यिकांच्या दरबारांत आले असते तर, मला वाटतं, त्यांना एखाद्या गुन्हेगाराप्रमाणे मान खाली घालून दूरवरच्या कोपऱ्यांत उभं राहावं लागलं असतं. परंतु सुदैवानं त्यांना त्या कोपऱ्यांत इतरहि सांगाती येऊन मिळाले असते. हरिभाऊ आपटे, कोल्हटकर, वामन मल्हार जोशी आणि किती तरी ! किंबहुना ज्ञानेश्वर-तुकाराम यांसारख्या महाकवींनी देखील त्या बहिष्कृत कोपऱ्याचाच आश्रय घेतला असता. कारण या सर्वांनी लिहिलं तें कांही तात्त्विक उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून. मला वाटतं, साहित्यांत ही एक नवीन पुरोहितशाही अवतीर्ण होत आहे. ठराविक मंत्रतंत्रांचा बडेजाव माजवायचा, आपली एक वेगळी उच्च जात बनवायची आणि चौफेर बहिष्काराच्या भिंती उभारून आपल्या अलिप्ततेचं रक्षण करण्याचा प्रयत्न करायचा हीं सारीं लक्षणं या उद्योगांत दिसून येतात.

साहित्यानं कधी क्रांति होते काय, असा बालबोध प्रश्न वारंवार विचारला जात आहे. साहित्यानं साक्षात् क्रांति होत नाही हें सांगायला कोणा विद्वानाची वा साहित्यश्रेष्ठाची आवश्यकता नाही. हा प्रश्न इतका वारंवार आणि इतका दरडावून विचारला जातो की,– होय–क्रांति होते ती केवळ साहित्यानंच, असा जबाब देण्याचा मोह अनावर होतो; पण तोहि खरा नव्हे. परंतु साहित्यानं कांहीच होत नाही असं मानणं म्हणजे साहित्याच्या अंगभूत सामर्थ्याचाच इन्कार करणं होय. साहित्याचं साहित्यत्व नाकारणं होय. साहित्यलेखनाच्या मागे विविध प्रकारच्या प्रेरणा असूं शकतात. सर्वत्र एकच प्रेरणा म्हणजे कलात्मक प्रेरणा असावी अथवा असते असा आग्रह धरून आपण साहित्याच्या विस्ताराला अस्वाभाविक मर्यादा घालीत असतो. या प्रेरणा सौंदर्यात्मक असतील, बालकवींच्या कित्येक कवितांप्रमाणे त्या भावनात्मक असतील, खांडेकरांच्या कांही कादंबऱ्याप्रमाणे त्या संशोधनात्मक असतील, गाडगीळ-गोखल्यांच्या कित्येक गोष्टींप्रमाणे त्या वैचारिक वा तात्त्विक असतील, खाडीलकरांच्या नाटकांप्रमाणे, आणि त्या पारमार्थिकहि असूं शकतील– संतांच्या कांही काव्याप्रमाणे माणसाचं मन, आणि तेंहि कलावंताचं संवेदनशील मन जेवढ्या अंगांनी जीवनाला स्पर्श करतं, तेवढा त्याच्या अनुभवाचा, प्रेरणेचा आणि अखेरतः साहित्याचाहि विस्तार असतो. कलावंत हा प्रथमतः कलावंत असतो हें खरं; परंतु तेवढाच त्याच्या व्यक्तित्वाचा, जाणिवेचा आणि जीवनाचा परिसर असत नाही. तो कलावंत असतो आणि इतर कांहीतरी असतो. त्याच्या व्यक्तित्वांतील हें कांहीतरी जेव्हा कलेच्या आश्रयानं वाङ्मयांत प्रकट होतं तेव्हाच त्या कलाकाराच्या व्यक्तित्वाचा संपूर्ण आविष्कार झाला असं म्हणतां येईल. एका व्यक्तीमध्ये एकाच प्रकारची अनुभवक्षमता वा प्रेरणा संभवते असंहि नाही. 'संध्यारजनी' आणि 'धर्मवीर' या दोन्ही कविता एका बालकवींनीच लिहिल्या आहेत. 'धर्मवीर' काव्यदृष्टीनं कमी वाटतं याचं कारण त्या विषयांत कांही दोष आहे अथवा तिच्यामागील प्रेरणा खोटी आहे हें नव्हे; तर ती प्रेरणा, तो अनुभव पुरेसा प्रभावी नाही म्हणून. सभोवारच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष जीवनाबरोबर प्रस्थापित होणाऱ्या संबंधांतून माणसाचं मन सिद्ध झालेलं आहे. त्या जीवनाचा विस्तार जेवढा मोठा तेवढाच विस्तार मनाचा, आणि जेवढा विस्तार माणसाच्या मनाचा तेवढाच साहित्याचाहि.

आग्रही मीमांसकांच्या कृपाकटाक्षासाठी आपल्या अनुभवाला, व्यक्तित्वाला, कलावंत कातरी लावूं लागले, तर मला वाटतं, साहित्य हें एकसुरी, दुर्बळ आणि बेचव झाल्याशिवाय राहणार नाही. शिवाय आणखी एक गोष्ट; साहित्याची गुणवत्ता त्याच्या लेखनामागे ज्या प्रेरणा असतात त्यांवर अवलंबून असते असंहि नाही. कोणी कांहीहि म्हटलं तरी वाङ्मय म्हणजे अखेरतः निवेदन ( communication ) असतं. आविष्काराचीच परिणति निवेदनांत होते आणि तें शब्दाच्या साहाय्यानं साहित्यरूप धारण करतं. तसं नसतं तर साहित्यिक पुष्कळदा लेखन करण्याऐवजी नुसते अंगविक्षेप आणि हातवारे करीत राहिले असते. तसं होत नाही. अनुभवाच्या सामर्थ्याबरोबर निवेदनाची समर्थता ज्या प्रमाणांत लेखकाजवळ असेल त्या प्रमाणांत तें साहित्य कमीअधिक प्रभावी होतं. कलात्मक वा सौंदर्यात्मक प्रेरणा आहे म्हणून तें साहित्य अभिजात स्वरूपाचं होईल आणि वैचारिक, तात्त्विक वा प्रचारात्मक प्रेरणा आहे म्हणून तें निकृष्ट होईल असं कोष्टक मांडणं साफ चुकीचं आहे; आणि चुकीचं आहे हें मी सांगतों असं नाही. अनेक शतकांतील साहित्याच्या इतिहासानं, काळानंच तें सांगितलं आहे. ज्या मीमांसाशास्त्राच्या कक्षेमध्ये काळाच्या कसोटीवर उतरलेलं सारं अभिजात, प्रभावशाली साहित्य समाविष्ट होत नाही तें शास्त्र— मग त्यांत तर्कांचा वा बुद्धीचा केवढाहि विलास असो— रसिकांच्या दृष्टीनं निरुपयोगीच म्हणावं लागेल. श्री. वसंत बापट यांची ' केवळ माझा सह्यकडा ' ही एक सुंदर कविता आहे. महाराष्ट्राविषयींचं हें उत्कट प्रेम वसंत बापटांनाच जाणवलं असं नाही. इतर शेकडो कवींना तें जाणवलं आणि त्यांनी त्या विषयावरती कविता लिहिल्या— छापल्याहि. पण श्रेष्ठ कवीजवळ स्वतःच्या अनुभूतींत मग्न होण्याचं, ती संघटित करण्याचं, तिच्यांतील भलंबुरं पाखडण्याचं, आणि शेवटीं समर्पक शब्दांतून तिचा आविष्कार करण्याचं जें बळ असतं, तें एकाजवळ आहे आणि इतरांजवळ नाही. म्हणून ती कविता आपल्या अंतःकरणाचा ठाव घेते आणि बाकीच्या मालगाडीप्रमाणे नुसता आवाज करीत आपल्यासमोरून निघून जातात. म्हणून साहित्यांत काय सांगितलं याला जेवढं महत्त्व तेवढंच कसं सांगितलं यालाहि आहे. केवळ अनुभवाच्या किंवा प्रेरणेच्या दृष्टीनं वाङ्मयाचं वर्गीकरण करून हें स्वीकारार्ह आणि तें नॉटपेड पत्रासारखं अस्वीकारार्ह असा भेदभाव करणं योग्य होणार नाही. लेखकाला वा कवीला जें जाणवतं तें त्याच्यापुरतं सत्य आणि वास्तवच असतं. सुंदर स्त्रीच्या डोळ्यांतील अश्रु तेवढा खरा, आणि दारिद्र्यानं गांजलेल्या लाचार माणसाच्या डोळ्यांतील अश्रु खोटा असं मुळीच नाही. सृष्टींतील सौंदर्य जेवढं खरं तेवढेच सामाजिक जीवनांतील प्रश्नोहि खरे आहेत. श्रद्धा प्रेमावर अथवा परमेश्वरावर जशी असूं शकते तशी ती एखाद्या राजकीय वा सामाजिक तत्त्वज्ञानावरहि असूं शकते. हें सारं साहित्यांत आल्यावाचून राहणार नाही, आणि येऊं नये म्हणून कोणी आग्रह धरला तर तो कोणी जुमानणारहि नाही.

साहित्य ही मानवी संसारांतील एक समर्थ किंबहुना सर्वांत अधिक समर्थ अशी वस्तु आहे. समाज हा संस्कृतीच्या वातावरणांत जिवंत राहत असतो आणि या संस्कृतीच्या प्रवाहांत सातत्य ठेवण्याचं, त्याला प्रगत करण्याचं कार्य साहित्य करीत असतं. माणसं मर्त्य असतात, पण त्यानं उच्चारलेला वाङ्मयीन शब्द मात्र अजरामर असतो. पृथ्वीवरच्या नाशवंत पसाऱ्यामध्ये हीच एक अशी शक्ति अशी आहे की जिला चिरंजीवनाचं वरदान लाभलेलं आहे. शब्दाच्या या शक्तीचा उपयोग करूनच संस्कृति जगत असते, पुढे जात असते. देशादेशांतील अंतर या शब्दानं कमी होतं आणि युगायुगांची साखळी या शब्दानंच जोडली जाते. या प्रभावी शक्तीचं, शब्दाचं अवतारकार्य कोणतं ? माणसाच्या मनावर संस्कार करणं हें एकच एक त्याचं अवतारकार्य होय. संस्कार करणं हा शब्दाचा स्वभाव आहे. साहित्य हें

शब्दाश्रित असल्यामुळे तेंहि वाचकाच्या किंवा श्रोत्याच्या मनावर कोणते ना कोणते संस्कार केल्याविना राहत नाही. साहित्याचा प्रचार, क्रांति, समाजवाद इत्यादि अनेकांना अप्रिय असलेल्या गोष्टींशीं संबंध येतो तो त्याच्या या संस्कार करण्याच्या सामर्थ्यामुळे. प्रकर्षानं किंवा तीव्रतेनं केलेला संस्कार एवढाच खरोखर 'प्रचार' या भयानक शब्दाचा साधासुधा अर्थ आहे. मूलतः या वाङ्मयाची जात कांही वेगळी असते किंवा त्यांत कांही स्वभावसिद्ध हिणकसपणा असतो असं मानणं तर्कदुष्ट आहे. लेखक लिहितो तें त्याला कांही सांगायचं असतं म्हणून. वाचक वाचतो तें लेखकाचं मनोगत त्याला स्वतःच्या मनांत समाविष्ट करवून घ्यायचं असतं म्हणून. साहित्याच्या उगमासंबंधी विविध मीमांसा संभवतील, परंतु साहित्य जेव्हा वाचकाकडे जातं तेव्हा त्याचं स्वरूप संस्कारात्मकच असतं ही गोष्ट मला वाटतं वादातीत आहे. माणसांचीं मनं म्हणजे नर्मदेतील शाळिग्रामांसारखीं स्वयंभू ठराविक आकाराचीं नसतात. प्रत्यहीं होणाऱ्या अगणित संस्कारांतून त्यांचा आकार आणि रागरंग तयार होत असतो. या संस्कारांत साहित्याचा संस्कार हा सर्वांत बलशाली असतो. जेव्हा एखाद्या समाजांत कांही स्थित्यंतर होतं, क्रांति होते, तेव्हा ती घडवून आणणाऱ्या शस्त्रांमागे किंवा मतांमागे माणसांचीं–लक्षावधि माणसांचीं संस्कारशील मनं नसतात काय ? साहित्यानं काय करावं आणि काय करूं नये हा प्रश्न वेगळा. पण साहित्य काय करूं शकतं याचाच विचार केला तर, कोणत्याहि लहानमोठ्या परिवर्तनास आवश्यक, आधारभूत अशी मनोभूमिका तें सिद्ध करूं शकतं असंच निश्चयानं म्हणतां येईल. महाराष्ट्राचा इतिहास किंबहुना आमची महाराष्ट्रीय वृत्ति घडवून आणण्यांत ज्ञानेश्वरतुकारामासारख्या कवींचा किंवा सगन-होनाजीसारख्या शाहिरांचा कांहीच भाग नाही का ? आम्हां भारतीय लोकांच्या भारतीयत्वांतून रामायणमहाभारता-सारख्या महाकाव्यांचे संस्कार सहस्र वर्षांच्या इतिहासालाहि निपटून काढतां आले आहेत काय ? वाङ्मयीन शब्द–मग तो धर्माच्या अनुरोधानं येवो, कथाकाव्यांतून येवो, नाट्यांतून येवो, किंवा वृत्तपत्राच्या अग्रलेखांतून येवो–माणसाच्या मनाला तो कांहीना कांही आकार व रंग दिल्याशिवाय राहत नाही. साहित्यानं परिवर्तनास साहाय्य होतं असं म्हणणारे दुसरं काय म्हणतात ? कथाकाव्यांतून संदेश मिळाल्याबरोबर वाचक कोटटोपी चढवून लगेच क्रांति करायला बाहेर पडतात, किंवा शत्रुपक्षाच्या मस्तकावर क्रांतिवादी पुस्तकं आदळून त्याचा कपाळमोक्ष करतात, असा दावा कोणीं केला आहे काय ? मन आकारित करण्याचं सामर्थ्य साहित्यांत असतं आणि कोणी कितीहि आरडाओरड केली तरी समाजाच्या जीवनांत जेव्हा संघर्षाचे, अटीतटीच्या झगड्याचे प्रसंग निर्माण होतात, तेव्हा कांही कलाकार साहित्याचं हें सामर्थ्य त्यांत पणाला लावल्याशिवाय राहत नाहीत, पूर्वी राहिले नाहीत आणि पुढेहि राहणार नाहीत हें नक्की. वाङ्मयजगांतील कांही नेते हें तत्त्वतः मान्य करायला खळखळ घालीत असतील, पण देशोदेशींच्या सरकारांनी हें व्यवहारतः मान्य केलं आहे; आणि म्हणूनच जुलमी राजवटींत प्रथमतः बंधनं पडतात तीं साहित्यावर—वाङ्मयीन शब्दावर. जनमनाशीं संबंध असलेल्या राज्यधुरंधरांना वाङ्मयीन शब्दाचं बळ माहीत असतं. दुर्दैव हें की, वाङ्मय निर्माण करणारे कित्येक प्रतिभाशाली कलावंतच तें आपल्याला माहीत नाही वा मान्य नाही म्हणून सांगत असतात.

मित्रहो, आता आणखी एकाच मुद्द्याचा उल्लेख करून मी हें विवेचन संपविणार आहें. साहित्य हें लौकिकापासून, जीवनापासून दूर ओढून नेण्याचा, अलिप्ततेच्या कबरस्तानांत कोंडून ठेवण्याचा सध्या जो सार्वत्रिक प्रयत्न होत आहे त्याचाच हाहि आणखी एक भाग आहे असं मला वाटतं. म्हणून या विवेचनाच्या संदर्भात त्याचं महत्त्व. श्री. गंगाधर गाडगीळ

यांनी कांही दिवसांपूर्वी साहित्यिकांच्या नीतीसंबंधी एक भाषण केलें. भाषण अत्यंत विचारप्रवर्तक आणि प्रक्षोभकहि होतें यांत शंका नाही. साहित्यिक हा नीतिबाह्य असावा हा त्यांच्या विवेचनाचा मथितार्थ आहे. लेखकानं सद्‌गृहस्थ होण्याचा प्रयत्न करूं नये हें एका इंग्रजी साहित्यकाराचं मत त्यांनी यथार्थ असल्याचं सांगितलं. हें मत मलाहि एकदम मान्य आहे. सद्‌गृहस्थ होण्यांत फायदे थोडे, तोटे फार. चालू समाजांतील रीतिरिवाज आणि नीतिनियम जो पाळतो त्याला आपण सद्‌गृहस्थ म्हणतों. म्हणजे नीतिनियमांच्या बाबतींत सद्‌गृहस्थ स्वतःची अक्कल चालवीत नाही, तर जें परंपरेनं समोर आलं असेल त्याचं श्रद्धापूर्वक ग्रहण करतो. अशा माणसाचे अनुभवहि स्थूल आणि सांकेतिक असण्याचा संभव असतो. तो चांगला लेखक होणारच नाही असं नाही, पण होणं कठिण आहे हें मात्र खरं. नीति या कल्पनेचा अर्थ प्रचलित समाजांत नेहमीच फार संकुचित म्हणजे नीतीच्या कांही आचारनियमांपुरता मर्यादित असतो. अशा लेखकाचं लेखन हें कदाचित् गुणशाली झालं तरी एकेरी आणि पारंपारिक होईल यांत शंका वाटत नाही. पण तरीसुद्धा लेखक हा पूर्णतः नीतिबाह्य असतो अथवा असावा असं म्हणतां येईल का? मला वाटतं, हें सर्वस्वीं अशक्य आहे. गाडगिळांनी सांगितलं की, 'नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुंडले' असं सांगणारा लक्ष्मण हा चांगला लेखक कधी झाला नसता. चोऱ्या–खून करणारा वाल्मीकि मात्र महाकवि झाला. हें थोडंसं खरं आहे. म्हणजे लक्ष्मण चांगला लेखक झाला नसता एवढंच खरं आहे. पण वाल्मीकीच्या बाबतींत ही गोष्ट ध्यानांत घ्यायला हवी की, तो जेव्हा रामायण लिहायला बसला तेव्हा त्यानं चोऱ्या–खून करण्याचं सोडून दिलं होतं. रात्रीं चोऱ्या करीत होता आणि दिवसा रामायण लिहीत होता असं वाल्मीकीचं चरित्र कांही संभवत नाही; किंबहुना तो रामाचं चरित्र लिहायला बसला तेव्हाच जीवनांतील कांही स्थिर नैतिक मूल्यांवरील श्रद्धा त्यानं प्रकट केली. लेखक हा मनुष्य असतो आणि नुसताच मनुष्य नसतो तर सुसंस्कृत मनुष्य असतो. आपल्या मनावरील नीतिमत्तेचे प्राथमिक संस्कार त्याला कधीहि पुसून टाकतां येणार नाहीत. या अद्‌भूत उद्योगांत यदाकदाचित् तो यशस्वी झाला तर तो लेखक राहणार नाही आणि बहुधा माणूसहि राहणार नाही. राक्षसांच्या अथवा पशूंच्या कोटींतील प्राणी श्रेष्ठ साहित्य निर्माण करतील अशी आशा बाळगणं कठीण आहे. या संबंधांत विशिष्ट काळाची गरज हें एक महत्त्वाचं कार्यकारी तत्त्व असतं. जुने नीतिनियम हे पुष्कळदा जुन्या अवजारांप्रमाणे गंजून जातात, न्याय देण्यास असमर्थ होतात, माणसांच्या मनावर अत्याचार करूं लागतात आणि समाजाच्या प्रगतीस अडथळा आणतात. एवढंच नाही, पुष्कळदा प्रस्थापित नीति ही खरोखर नीति नसतेच. तें एक नीतीचं नाटक असतं. आज खऱ्याखोट्याच्या, व्यभिचाराच्या, मद्यपानाच्या आणि जुगाराच्या खुंटाभोवती फिरणारी नीति ही अशा प्रकारची बनावट नीति आहे. किंबहुना प्रचलित समाजरचनेच्या तळाशीं सळसळत असलेल्या अत्यंत निर्दय आणि हिंस्र अशा अनीतीच्या महासर्पांचं रक्षण करण्यासाठी, त्यांच्याकडे माणसांचं लक्ष वेधूं नये म्हणून, हीं लैंगिक आणि आध्यात्मिक नीतीचीं झापडं लोकांच्या डोळ्यांवर परंपरेनं चढविलीं जातात. तेव्हा रूढ सांकेतिक नीतीचं उल्लंघन लेखकांनी केलं तर नवल नाही, ते बहुधा करतातहि. पण या बहिष्कारांच्या आणि नियमांच्या जंजाळापलीकडे असलेल्या, माणसाला माणुसकी देणाऱ्या शुद्ध सनातन नीतीचं दर्शन त्यांच्या प्रतिभेला व्हायला नको काय? आल्बर्टो मोराव्हिया या इटालियन लेखकाची '' रोमची स्त्री ' ही गाजलेली कादंबरी आहे. प्रस्थापित नीतिकल्पनांची बूज लेखकानं या कादंबरींतील एकाहि पानावर राखली आहे असं दिसत नाही. सोवळ्या मनोवृत्तीच्या माणसाला जन्मभर हैराण करील एवढी अश्लीलता या एका कादंबरींत ठासलेली

वा. दा. गोखले

# अवचितसुत काशी – द्रौपदी-स्वयंवर

( एक किंचिद्ज्ञात व उपेक्षित काव्यग्रंथ* )

मराठी वाङ्मयांत ' स्वयंवर–काव्यें ' हा एक स्वतंत्र विषय अभ्यसनीय स्वरूपाचा आहे.[1] रुक्मिणी, सीता, द्रौपदी या व अशाच इतर आदर्श महिलांच्या स्वयंवरांची कथा मराठी कवींनी मोठ्या भक्तिभावाने गाइली असून त्यांतील कांही अद्यापिहि भाविकांच्या नित्यपाठांत समाविष्ट झालेल्या आहेत. नरेंद्र, संतोषमुनि (कृष्णदास), एकनाथ, सामराज, नागेश, विठ्ठल, जयरामस्वामी, अनंततनय इत्यादि कवींच्या प्रतिभेचा उन्मेष या स्वयंवर-काव्यांत डोळ्यांत मरण्याजोगा दिसून येतो. या कविमालिकेंत शोभून दिसणारा एक रसाळ कवि उपेक्षित स्थितींत असावा ही गोष्ट मोठी अक्षम्य आहे असें म्हणावें लागतें. अवचितसुत काशी याने " द्रौपदी-स्वयंवर " या एकाच विषयावर दोन ग्रंथ[2] लिहिले असून मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत या कवीचा व त्याच्या काव्यकृतींचा केवळ धावता उल्लेख दिसून येतो.

यांपैकी एक ग्रंथ सर्गात्मक असून त्यांत विविधवृत्तबद्ध एक हजार श्लोक आहेत. दुसरा ओवीबद्ध आहे. त्यांतील एकोणतीस प्रसंगांत ३६३८ ओव्या आहेत.

कवीने स्वतःविषयी भरपूर माहिती दोन्ही ग्रंथांच्या अखेरीस दिली आहे.

श्रीवंशाधिपती निशारमण तो वृत्ती स्वदेशाननीं ।
सोळंखी कुळधर्म श्रीपति कुळस्वामी रूहूलोचनी ॥
भारद्वाज सुगोत्र जाण जननी ते अन्नपूर्णा असे ।
तात श्रीअवचीतराव अवनीं प्रौढी प्रतापें वसे ॥
पीतुराज तयासि भक्ति पढिये श्रीकेशवाची सदा ।
ठेवी श्रीपति पौरनाम नगरा सेवी हरीच्या पदा ॥
वृत्तीकारण सैन्यपाळण करी शत्रू रणीं मोडिले ।
तेणें विग्रह वाढला मग जगीं वैरी बहू जोडिले ॥

---

* या ग्रंथाची संशोधित आवृत्ति तयार करण्याचें कार्य परिषदेच्या संशोधन-विभागाने आरंभिलें आहे. हस्तलिखित प्रत परिषदेचे चहाते श्री. भा. अ. चांदोरकर, सटाणे यांच्या संग्रहांतील असून शिळाछाप प्रत श्री. प. त्रिं. सहस्रबुद्धे, चिटणीस, मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें, यांनी उपलब्ध करून दिली आहे.

१. संत-कवि-काव्य-सूचींत—अभिमन्यु-विवाह (२), उषास्वयंवर (२), कौसल्यास्वयंवर (१), द्रौपदीस्वयंवर (६), रुक्मिणीस्वयंवर (१५), सीतास्वयंवर (१४), असे ४० स्पष्ट उल्लेख आहेत.

२. श्लोकात्मक ग्रंथ बाळकृष्ण कानडे यांनी शके १८२२ मध्ये शिळाप्रेसवर छापला असून दुसरा ग्रंथ शके १८१४ त निर्णयसागर मुद्रणालयाने प्रसिद्ध केला आहे. आज दोन्ही ग्रंथ दुर्मिळ आहेत.

त्या दुःखें त्यजिला निवास जनकें गोपाळ नामें गिरी ।
बांधोनी बळकाविला, नृपदळें चालोनि आलीं वरीं ॥
संग्रामीं गड नागवे मग तिहीं विश्वासघातक्रिया ।
केलें बंधन संकटांत पडलों हा हा हरी सावया ॥
बंधू त्र्यंबकराज तात विषयीं होते सर्वे सोयरे ।
आतां काय उपाय घाय न चुके दिल्लींद्र मारील रे ॥
ऐशा घोर भवार्णवांत जनकें बोधासि आरोपिलें ।
घ्या रे घ्या हरि सांवळ्या तिवचनीं सर्वांतरीं लागलें ॥
गेले दोष मनांत तोष भरले श्रीकृष्ण घोषें पहा ।
कैचें बंधनयुक्त मुक्त हृदयीं आनंद जाला महा ॥
श्रीकृष्णें नीजरूप दाउनि मला स्वप्नांत आलिंगिलें ।
प्रेमाचा पुर फूटला मग मुखें वक्तृत्व हें लोटलें ॥

वरील उताऱ्यावरून व ओवीबद्ध ग्रंथाच्या आधारें असें समजतें की अवचितराव हा भारम गांवचा देशमूख असून तो चंद्रवंशी क्षात्रिय होता. आडनांव सोळंखी व गोत्र अत्रि. त्र्यंबक व काशी हे अवचितरावांचे दोन सुपुत्र. अवचितरावांची क्षात्रवृत्ति असूनहि ते विठ्ठलाचे सात्त्विक भक्त होते. श्रीविठ्ठल आपला पाठीराखा आहे या विश्वासावर त्यांनी गांवानजीकच्या दुर्गावर आक्रमण करून तो काबीज केला. 'गोपाळगिरि' असें त्याचें नांव ठेविलें. परंतु 'विश्वासघातक्रिये'मुळे ते आपल्या मुलांसह दिल्लींद्राचे (औरंगझेबाचे) कैदी झाले. पुढे कांही दिवसांनी अवचितराव निधन पावले व त्र्यंबक–काशी बंधमुक्त होऊन परत गांवीं आले.

काशी कवीने आपल्या पित्याबद्दलचा नितान्त आदर पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे:–

देतो जन्म पिता परंतु जनकें नाहीं गती दिधली ।
नाहींहि म्हणतां नये महितळीं कोणी असे शोधिली ॥
वक्तृत्वा मुळ हें म्हणोनि वदलों म्या सज्जना वोपिली ।
आतां सार विचार फार वदणें राहो कथा संपली ॥
श्रीगुरु होउनि अवचितें । ब्रह्म मज दाविलें अवघें तें ।
भाग्यानुसार करविताचि ते । लागोनी गेली हृदयीं ॥
तातमंत्रें मी पापात्मा । पावन झालों पंडितोत्तमा ।
मग वक्तृत्व महिमा । तुम्हामध्ये पावलों ॥
पिते सकळांसीं असती पाहीं । परी समर्था भेटवी ऐसा नाहीं ।
नाहींही म्हणतां नये मही । कोणी शोधिली आहे ॥

स्वदेश (महाराष्ट्र) व स्वभाषा (मऱ्हाठी) यांचा उत्कट अभिमान दोन्ही ग्रंथांत व्यक्त झाला आहे.

(१) भाषामची प्राकृत राष्ट्रिक हो मऱ्हाठी
याहे विशेष कवि वंश कुळी मऱ्हाठी ।
ते दक्षिणेश तनया कुळ ही मऱ्हाठी
शृंगार यास्तव करी मग हो मऱ्हाठी ॥
आमुची देशभाषा मऱ्हाठी । जन्मही महाराष्ट्र कुळवंटीं ॥
ते दक्षिणेशतनया हो मऱ्हाठी । मग महाराष्ट्र शृंगार करिती झाली ॥

काव्योपसंहारांत कवि विनवितो:—

**मऱ्हाटी टीका देश भाषा मऱ्हाटी ।**
**मऱ्हाटी कुळी जन्मवाणी मऱ्हाटी ।**
**गुरूग्रंथही सेविला म्यां मऱ्हाटी ।**
**करावी क्षमा न्यून्यते पूर्ण दृष्टी ॥**

कवीची भाषा रसाळ व अलंकारिक असून प्रसादगुणाने भरलेली आहे. त्याचीं वर्णनें हृदयंगम असल्याने काव्य वाचीत असतांना त्या त्या घटना आपण प्रत्यक्ष पाहात आहोंत किंवा ते ते प्रसंग प्रत्यक्ष अनुभवीत आहोंत असेंच वाटतें.

द्रौपदी जन्माला आली ती

**गांधार कर्मकुळ निर्मूळ हो कराया ।**
**ते पार्वती प्रकट पावन होय राया ॥**
**ते सुंदरा उपवरा दिसमास दावी ।**
**चिंता पिता करि सुता कवणासि द्यावी ॥**

द्वारकेचें वर्णन कसें बहारीचें आहे पाहा:—

**सुरीं सांडिलें सौख्य शक्रावतींचें ।**
**सदा सेविती प्रेम द्वारावतीचें ॥**
**विधी रुद्र लाचावले त्या सुखासी ।**
**पुसे कोण तेथें नरां निर्जरांसी ॥**
**दुरोनि अशी द्वारका देखियेली ।**
**पुढां चालतां दीसती वृक्षवल्ली ॥**
**वनें दाटलीं ताळ माळां जनांहीं ।**
**धरा तेथींची भास्करा दृश्य नाहीं ॥**

भीम-बकासुर युद्धप्रसंगांत क्रोधाविष्ट झालेला तो राक्षस

**दावाग्नि घृतिं सिंपिला कडकला कीं काळ वर्वोळला ।**
**कीं तो व्याळ महाफणी वर गिरी पुच्छासनीं ताडिला ॥**
**तैसा राक्षस कोपला रणमहीं युद्धाप्रती ठाकला ।**
**आला भीम वरी तयाप्रति कसें तो तोंडिया बोलिला ॥**

दोघेहि युद्धाला

**पेटले दोघहि घोर द्वंद्वासळे ।**
**हाणिती घाय ते एकमेकां बळें ॥**
**फोडिती प्रचंड हाक ते संगरीं ।**
**व्योम कांपे तळीं भूमिका थर्थरी ॥**

स्वयंवराची तयारी चालू आहे, त्यासाठी

**प्रौढा प्रगल्भा अबला नि बाळा ।**
**मुग्धानुपम्या सगुणा सुढाळा ॥**
**सुवासिनी ब्राह्मणि कामरेखा ।**
**रामा मिळाल्या करि कोण लेखा ॥**

अभ्यंगस्नान झालें आणि द्रौपदीने वस्त्रपरिधान केलें:—

पायघोळ कटि सुंदर नागरा ।
नेसली तगडी मृदु घागरा ॥
कंचुकी तट तटी उरीं कैसी ।
पावकेंचि दिधली उटी जैसी ॥

वस्त्रालंकारांनी नटलेली द्रौपदी कशी दिसते:—

नव्हे सौंदर्याब्धीवरिल लहरी साकृतवली ।
नव्हे तारुण्याची सवळ सरिता तुंवळवली ॥
नव्हे लावण्याची लवलव लता एकवटली ।
नव्हे तेजाग्नीची त्रिभुवनकळा नारि नटली ॥

स्वयंवर-मंडपांत जातांना प्रेमळ माता मुलीला आशीर्वाद देते.

पाव तूं चिंतिलें मंडपा जाऊनी ।
भेट देईं मला मागुतां येउनी ॥
दृष्टि लागे झणीं प्राणगंगे तुला ।
कस्तुरीचा टिळा म्हणूनी रेखिला ॥

सौंदर्यवती द्रौपदीला पाहून

कोण पुण्य पाप माय वाप बंधु सासरी ।
कोण दान धर्म कर्म नेम नित्य वासरी ॥
कोण देव कोण भाव भक्ति मुक्ति कोवरी ।
को जपादि को तपादि सर्व धर्म नोवरी ॥
टकमक नयनाचे देव जाले गुणाचे ।
विनमुख वचनाचे मौन्य जाले मनाचे ॥
वधुशर वदनाचे लागले वेधनाचे ।
हृदईं जनजनाचे रंगले वेधनाचे ॥

कारण

उगवली रजनी समुखें वधू ।
विचरला जगीं कामकरू वधू ॥
सुरवरीं सुरता क्रम सांडिला ।
मुनिवरीं नवरीजप मांडिला ॥
मनीं येक जाले महाचंचळस्तू ।
विराले सभे येक जाले गलिस्थू ॥
गळालीं धनुष्यें धरेमाजी माती ।
असे ते पणा भेदिती काय माती ॥

श्रीगांधार, वैदर्भ—वैराटादि प्रथेंद्र नरपति मंडपीं बसले आहेत आणि त्यांच्या मांडीला मांडी लावून मऱ्हाटे राजे शोभत आहेत ते कोण—

सीसोदे शिरसाट वाघ चवरे शेलार साठे बरे ।
गाडे गायिकवाड, घोरफडिये, श्रीघाटगे, ढेवरे ॥

अनुक्रमणिका

साळुंखी, जगताप, जाधवचि ते, इंडायिते, इंगळे।
माने, तुंवर, मोहिते, मगर, ते मोरे प्रखंडागळे ॥
श्रीसावंत, निकुंभ राठवडिये ते गौंड गुंजाळ जे।
कोकाटे, कुरूकांकळीज, सुरवे, काटे, प्रधूमाळ जे ॥
श्रीचव्हाण, पवार, सोनगरिये, काळे, सितोळे, मले।
शिंदे आणि अहीर, दोरक, कडू, खैरे उसीराथिले ॥
सोमंशादिक सूर्यवंश उभयी छत्तीस राजेकुळी।
जे होते नृपमंडपीं मिरवले छत्रातपत्रावळी ॥

पुढे श्रीकृष्णाच्या आदेशाने द्रुपदराजाने मत्स्यभेदाचा पण जाहीर केला व त्याबरोबर असेंहि सांगितलें की—

त्रिवाणाची संख्या करिल नृप जो पूर्ण विजयी।
तया घाली माळा अचुक निजबाळा गुणमयी ॥
परी आहे माझा कठिण पण घोरांद्र असा।
चुके तो घालावा उचलुनि कटे माजि सहसा ॥

उपस्थित राजे हें ऐकून घाबरले, त्यांना वाटलें

बोलावुनी भूभुज या नृपालें।
आरंभिलासे नर-याग यानें ॥

कित्येकांना ती "राजबाळी" नसून "राजकाळी" वाटली. क्षत्रिय राजांत पण जिंकणारा कुणी नाही हें पाहून द्रुपदराजा द्विजसभेकडे गेला; बिचारे ब्राह्मण, त्यांना वाटलें

धन्य हा भूपती पुण्यकीर्ति भला।
दक्षणा द्यावया स्वयेंची पातला ॥
मंत्र उच्चारिती येक ते आदरें।
येक होती पुढां घेउनी लेकरें ॥

परंतु द्रुपदराजाने त्यांना पण जिंकण्याचें आव्हान केलें तें ऐकून ते बिचारे सर्दच पडले. ते म्हणतात—

स्वप्नींहि शर कार्मुका स्पर्शलों नाहीं नरेंद्रा कधीं।
आम्हा हा पण बोलणें उचित हें नाहीं जगत्रामधीं ॥

शेवटीं कृष्णकृपेने अर्जुनाने पण जिंकला तेंव्हा

प्रलयगजर केले वाद्यवाजंतरांहीं।
किरिटिवरी फुलांची वृष्टि केली सुरांहीं ॥
उदित मग गयंदी लोटुनी राजबाळा।
रविसुतरिपुकंठीं घालिते सूत्रमाळा ॥

विप्राला क्षत्रियकन्या 'जाया' म्हणून शोभत नाही. ती आमच्या स्वाधीन कर असें पुढे युद्धप्रसंगीं कर्ण अर्जुनाला बोलतो. त्याला अर्जुन उत्तर देतो—

गा वीरा, रथिया, महादळनिधी तूं बोलिलासि खरें।
द्यावी काढुनि अंगींची परि कशी छाया नरें नागरें ॥
दिसी चाळुनि आपुली जगीं न ये देतां तया भास्करा।
तैशी जाण निजांगना कुळवधू देतां न ये रे नरा ॥

चंद्रीं शीतळता सुनिश्चित कशी वांचोनि दे तो परा ।
देतां येइल आपुली प्रजडता कैशी महाडोंगरा ॥
गोडी गंभिर आमृतोदरिं असे ते प्राप्त कैची खरा ।
तैसी जाण निजांगना कुळवधू देतां न ये रे नरा ॥

या प्रसंगीं झालेल्या युद्धवर्णनांत वीररसाचा परिपोष उत्कृष्ट साधला असून तें वर्णनहि स्वभावोक्तिपूर्ण वठलें आहे–

शताचीं शतें बाण लक्षोनि घाली ।
सथाटी शराची नभीं दाटी झाली ॥
लघु लाघवी जिष्णु संधान सारी ।
न येतां अरीचे वरी बाण वारी ॥

रणभूमीचा भयानक देखावा कसा होता–

वाजी वारण धीरवीर पडले ते कोण संख्या करी ।
येकाचे कर कंठ पाय तुटले कित्येक गेले उरीं ॥
जाली मांसमयी रणांगणमही अश्वीं नरीं कुंजरीं ।
वाहे रक्त विशाळ विभ्रम दिसे व्याली वरी शार्वरी ॥
हुंकारें भरती भयानक गिरा जे वीर जाले चुरा ।
घायें घूमति गर्गरानुभवतीं कल्पांत दुःखान्तरा ॥
आल्या शंखिनी डंखिणी सह गणीं झोटिंग धांवोनिया ।
घाली गोंधळ भूतमेळ सरिसा वेताळ घेवोनियां ॥

यथाविधि विवाह संपला व सर्व आपापल्या घरीं परतले व द्रौपदीस्वयंवर पूर्ण झालें. कवि विनयाने सांगतो की, आपण "नाहीं पिंगल पाहिलें;" 'सारस्वतांच्या लिपा' नाहीं पाहिल्या; जपतपकर्म केलें नाहीं; परंतु "कोणें हा रस पावऊनि पडपा संपूर्ण केली कृपा." अशी अलौकिक कृपा करणारा तो कोण–

ज्या नामें पृथिवी समूळ तरली तें नाम वाचे वसो ।
ज्या रूपें सगरात्मजा समजली तें रूप ध्यानीं असो ॥
ज्या पादें फणि काळिया स्परशिला तो पाद भाळीं ठसो ।
ज्या हस्तें गिरि (गो) वर्धना धरियला तो हस्त माथां बसो ॥

प्रस्तुत ग्रंथ रसाळ, प्रसादपूर्ण आहे हें खरें, परंतु वृत्तरचनेंतील शिथिलता व त्यासाठी करावी लागणारी शब्दांची ओढाताण मधून मधून खटकते.

कवीने ग्रंथरचनेचा काळ शेवटीं दिला आहे. ओवीबद्ध ग्रंथ

शालिवाहन शके सुंदर । सोळा शतें अठरावर ।
ते दिवशीं पांचाळ स्वयंवर । टीका संपूर्ण समाप्ती ॥
धाता नाम होतें संवत्सर । पौष वद्य दशमी गुरुवार ।
ते दिवशीं द्रौपदी स्वयंवर । टीका संपूर्ण समाप्ती ॥

म्हणजे हा ग्रंथ शके १६१८ पौष वद्य १० गुरुवारीं पूर्ण झाला. इंग्रजी ७ जानेवारी १६९७.

[पुढील मजकूर पान ३ वर पाहा.]

# साहित्य-समीक्षा

## राग–रंग

मराठी नाट्यसंमेलनाचें ४२ वें अधिवेशन, फेब्रु. १९६० मध्ये श्री. वसन्त शां. देसाई यांच्या अध्यक्षतेखाली बडोदें येथे भरलें. तत्प्रीत्यर्थ श्री. देसाई यांचें हें पुस्तक व्हीनस बुक-स्टॉलने प्रकाशित केलें आहे. 'राग-रंग' हें पुस्तक सर्वस्वी नवीन आहे असें जरी म्हणतां आलें नाही, तरी श्री. देसाई यांच्या 'धनंजय' या नांवाने २० वर्षांपूर्वी लिहिलेल्या 'कलावंतांच्या सहवासांत' या पुस्तकाचें पुनर्मुद्रण मात्र तें निश्चित नाही. कारण 'राग-रंगां'त 'कलावंतांच्या सहवासां'तील कांही व्यक्तिचित्रें गाळून, त्यांऐवजी सात कलाकारांचीं व्यक्तिचित्रें अगदी नव्याने लिहून समाविष्ट करण्यांत आलीं आहेत. अर्थात् या आंतील फेरफारामुळे प्रकाशकांनीहि, पूर्वीच्या पुस्तकाच्या नांवांत फेरफारच नव्हे तर संपूर्ण बदल करून, 'राग-रंग' हें नांव, कलावंतांच्या या व्यक्तिचित्र-संग्रहाला दिलें. 'राग-रंग' या नांवाच्या स्पष्टीकरणार्थ ते प्रारंभींच लिहितात, "'राग' व्यवस्थेवर आधारलेल्या हिंदुस्थानी संगीतांत 'रंग' भरणाऱ्या आणि गायक नसले तरी आपापल्या कलेची मैफल 'रंग'विणाऱ्या कलावंतांचें दर्शन घडविणाऱ्या या संग्रहाकरिता 'राग-रंग' हें नांव मीं निश्चित केलें."

'कलावंतांच्या सहवासांत' या पुस्तकांत महाराष्ट्राच्या कलामंदिरांतील ज्या निवडक अशा दहा कलावंतांच्या स्वभावाबद्दल आणि कामागिरीबद्दल श्री. देसाई यांनी लिहिलें, तें लिहितांना 'सन १९०९ ते १९३८ या दीर्घ कालखंडांतील महाराष्ट्रीय नाट्यकलेच्या आणि सिनेमा-व्यवसायाच्या इतिहासाची रूपरेषाच' वाचकांना दिसून यावी अशी कल्पना लेखकाची होती. परंतु 'राग-रंगा'त ही ऐतिहासिक दृष्टि ठेवून व्यक्तिचित्रांची निवड लेखकाने केलेली नाही. साहित्य, संगीत, चित्र, नाट्य, सिनेमा इत्यादि कलांच्या संमिश्र मैफलीचेंच स्वरूप 'राग-रंग' या संग्रहास प्राप्त झालें आहे. विशेषतः अल्लादियाखाँ, भास्करबुवा, फैयाजखाँ, सवाई गंधर्व इत्यादि दिगंत कीर्तीच्या, कलावंत गायकांच्या व्यक्तिचित्रांचा 'राग-रंगां'त नव्याने अंतर्भाव केल्यामुळे, संगीत कलेला येथे चांगलेंच व ठळक प्रतिनिधित्व मिळालें असल्याचें दिसेल.

'राग-रंगां'त आलेलीं व्यक्तिचित्रें हीं सर्वसामान्य व्यक्तींचीं, किंवा केवळ कांही नमुनेदार व्यक्तींचींच स्वभावाचित्रें नाहीत. असामान्य आणि लोकोत्तर अशा कलावंतांचीं तीं शब्दचित्रें आहेत. कलावंत हा त्याच्या कलेमुळे लोकांचा लाडका झालेला असतो व त्याच्यासंबंधी नेहमीच एक कुतूहल आणि आकर्षण सामान्यांना वाटत असतें. गीतेंतील 'स्थितधी' प्रमाणे कलावंतहि चालतो कसा, बोलतो कसा, त्याच्या आवडीनिवडी काय इ. इ. संबंधी माहिती करून घेण्याची उत्कंठा कलावंताच्या चाहत्यांना असते. कलावंतालाहि त्याच्या कलेव्यतिरिक्त एक वेगळें असें जीवन असतेंच. अर्थात् तें जगत असतां त्यांतहि तो आपली कलावृत्ति कशी प्रकट करतो हें जाणून घेण्याची लोकांना इच्छा असते; त्याचें, त्याच्या अंतरंगाचें अगदी जवळून

---

**राग-रंग** – [ लेखक : वसन्त शान्ताराम देसाई; प्रकाशक : व्हीनस बुक-स्टॉल, पुणें २; मूल्य रु. ३–५० ].

अनुक्रमणिका

दर्शन घेण्याची त्यांना ओढ असते. परंतु प्रसिद्धीच्या उंच मनोऱ्यावर बसलेल्या कलावंतांच्या सान्निध्यांत जाणें सर्वांना शक्यहि नसतें, तर कांहींना दुरूनच आपली कुतूहलपूर्ति करून घेण्यांत सुरक्षितता वाटते. श्री. देसाई हे स्वत: कायदेपंडित, नाट्यलेखक व कलारसिक असल्यामुळे कलावंतांच्या सहवासांत मानाने बसण्या-उठण्याची संधि त्यांना मिळाली. संगीत, नाट्य, चित्र इत्यादि कलांतील थोर कलावंतांशीं त्यांचा प्रत्यक्ष परिचय झाला. त्यामुळे विद्यमान व दिवंगत अशा अनेक कलावंतांबद्दल कितीतरी आठवणी, स्वत: पाहिलेल्या प्रसंगांवरून व दुसऱ्यांनी सांगितलेल्या विश्वसनीय माहितीवरून त्यांच्याकडे जमा झाल्या; आणि त्या सर्वांचा मोठा कुशलतेने उपयोग करून, त्या त्या कलावंतांचीं व्यक्तिचित्रें श्री. देसाई यांनी समरसतेने आणि ढंगदारपणें रेखाटून रसिकांना सादर केलीं.

कलावंतांच्या कलेबद्दल लोकांना कितीहि प्रेम आणि आदर असला तरी त्यांच्यासंबंधी ईषदनादरयुक्त अशा कांहीं अपसमजुतीहि लोकांत प्रचलित असतात. केवळ परमेश्वरी देणगीवरच हे कलावंत पुढे आलेले असून, अन्य दृष्टींनी ते अगदीं गांवढळ, अडाणी, हट्टी, व्यसनी असल्याचाहि बराचसा बोभाटा त्यांच्यासंबंधी झालेला असतो. कलावंतांची एक वेगळीच दुनिया आणि त्यांची एक वेगळीच जात असल्यासारखी अनेकांना वाटते. श्री. देसाई यांच्या, कलावंतांच्या व्यक्तिचित्रांचा उपयोग वरीलसारख्या बऱ्याचशा अपसमजुती नाहीशा करून टाकण्यास अधिक होण्यासारखा आहे असें म्हणावेसें वाटतें. खरें म्हणजे असामान्य योग्यतेचे कलावंतहि अनेक दृष्टींनी सामान्यांचेंच जीवन जगत असतात. सामान्य माणसाप्रमाणेच कलावंतांच्या स्वभावाचेहि कांहीं मजेदार पैलू असतात. त्यांचींहि कांहीं दौर्बल्यें, कांहीं दोष असतात; त्यांच्याहि जीवनांत संगर असतें; हार-जीत असते. कुशल व्यक्तिचित्रकार या नात्याने श्री. देसाई यांनी वाचकांना विश्वासांत घेऊन, कुठे चरित्रात्मक, तर कुठे परिचयात्मक, तर कुठे केवळ बाह्य वर्णनात्मक पद्धतींचा अवलंब करून लोकोत्तर कलावंतांच्या कलांबरोबर, त्यांच्यांतील सामान्य माणसाचेंहि दर्शन मोठ्या जिव्हाळ्याने वाचकांना घडविलें आहे. या दृष्टीने ही 'राग-रंगा'ची मैफल चांगलीच 'जमली' आहे असें मोकळ्या मनाने म्हणावयास मुळीच हरकत नाही. आपल्या व्यवसायापलीकडे, आपल्या रसिकतेचा विस्तार करून विविध क्षेत्रांतील व्यक्तींच्या जीवनाचा, त्यांच्या अंतरंगाचा कलात्मक परिचय करून देणारीं, हीं जीं व्यक्तिचित्रें श्री. देसाई यांनी लिहिलीं त्यामुळे वाङ्मयाचें एक दालन खऱ्या अर्थाने शृंगारलें गेलें असें म्हटलें पाहिजे. एका ठराविक प्रकारच्या वाङ्मयाला जो सध्या विशेष पूर आलेला दिसतो त्यांत कलावंतांच्या व्यक्तिदर्शनाचा हा वाङ्मयप्रकार खरोखर स्वागतार्हच वाटेल.

'राग-रंग' या संग्रहांत हिंदुस्थानी संगीतांत 'रंग' भरणाऱ्या दिगंत कीर्तीच्या तीन खानदान गायकांचा – अल्लादियाखाँ, भास्करबुवा व फैयाजखाँ यांचा परिचय लेखकाने करून दिलेला आहे. 'खाँसाहेबांकडे पाहिलें म्हणजे आपण हिमालयासमोर उभे आहोंत असें वाटायचें'. या एका वाक्यांत लेखकाने अल्लादियाखाँसाहेबांच्या शुचिधवल आकृतीने शोभणाऱ्या व्यक्तिमत्त्वाचा, व त्याचबरोबर उत्तुंगतेचा आणि बिकटतेचा मानदंड मानल्या जाणाऱ्या त्यांच्या कलेचा परिणामकारक परिचय घडवून दिला आहे. गात्या गळ्याचें मडकें झाल्यामुळे अपमानित होऊन मेलेलें अन्न न खाण्याचा निर्धार करणारा 'भास्क्या' आपल्या जिद्दीने आणि कष्टमेहनतीने संगीत-भास्कर (भास्करबुवा बखले) झाला ही आठवण, 'पाणक्या'चा रामशास्त्री झाला याच तोलामोलाची समजली पाहिजे. 'प्रेमपिया' या नांवाने फैयाजखाँनीं अनेक सुंदर चिजा बांधल्या हें प्रसिद्धच आहे. परंतु त्यासंबंधी लेखकाने सांगितलेला किस्सा मौजेचा आहे. तो लिहितो, "खाँसाहेबांच्या दोन्ही बायकासुद्धा 'घराणेदार' होत्या. भास्करबुवा

बखले यांचे गुरु बडोद्याचे फैजमहंमदखाँ यांची एक कन्या, तर दुसरी ' दरसपिया ' या नांवाने अनेक सुंदर चिजा बांधणाऱ्या मेहबूबखाँची कन्या ! ' दरसपियां ' च्या कन्येच्या प्रेमांत सापडल्यावर ' प्रेमपिया ' बनून फैयाजखाँनी चिजा बांधल्या त्यांत नवल कोणतें ? ''

खानदान गायकांबरोबर हिंदुस्थानी संगीतांत आणि खूप गाजलेल्या महाराष्ट्रीय नाट्य-संगीतांत, दोन्हींतहि जे सव्यसाचित्वाने चमकले अशा नाट्यव्यवसायांतील गायकगायिकांचें— सवाई गंधर्व, केशवराव भोसले, विनायकबुवा पटवर्धन व सौ. हिराबाई बडोदेकर यांचें— व्यक्तिदर्शनहि लेखकाने येथे घडविलें आहे. ' आजारी मनुष्याला सुद्धा बरं करील ' इतकं गोड गाणं गाणाऱ्या हिराबाईंची गानसाधना, रंगभूमीवरहि त्यांनी मिळविलेलें यश, कला-चातुर्याबरोबर ' निष्कपटता, निरभिमान आणि निर्लोभता ' या सद्‌गुणत्रयीने ओळखल्या जाणाऱ्या सुस्वभावाच्या संस्कृतीची हिराबाईंनी केलेली जोपासना, इ. गोष्टींच्या मार्मिक वर्णनांनी या व्यक्तिचित्राला चांगलाच उठाव मिळालेला आहे. " नाटकधंद्यांत नुकसान झालं याचं मला वाईट वाटत नाही. एक वर्षभर जलशांची सफर करून येईन तर सर्व देणं देऊन टाकीन '' असें म्हणणाऱ्या हिराबाईंच्या आत्मविश्वासाची जात लोकमान्य टिळकांच्या आत्मविश्वासाचीच असल्याचा प्रत्यय त्यांच्या वरील उद्गारांत वाचकाला येतो. " सिंहगडावर एखादे वर्षभर जाऊन राहून, गीतारहस्यासारखा एखादा ग्रंथ लिहून मी माझें सर्व ऋण सहज फेडून टाकूं शकेन '' अशा आशयाचे टिळकांचे उद्गार प्रसिद्धच आहेत. श्री. केशवराव दाते यांचाहि परिचय असाच मोठा मार्मिक उतरला आहे. दाते म्हणजे परिश्रम; अचाट उद्योग; कलेला निर्दोष व परिपूर्ण करूं शकणारी आयुष्यभरची साधना ! ' आम्ही मजूर आहोंत ' हे लेखकाने उद्‌धृत केलेले त्यांचे उद्गार फार महत्त्वाचे आहेत. मात्र ' फुकट नाटक पाहण्यापलीकडे माझी कुणी ओळख ठेवील की नाही ' अशा कुशंकेने उद्विग्न होऊन समाजापासून थोडें-फार दूर राहणाऱ्या दात्यांसारख्या एका थोर नटाच्या खोल अंतरंगांत कोणती वाडव्यथा धुमसत आहे याची कल्पना वाचकाला येथे नव्यानेच येते. फाळक्यानंतर महाराष्ट्र-चित्रपट-व्यवसायाचें क्रांतिकारी पर्व नव्या जोमाने आणि तितक्याच नवप्रतिभेने निर्माण करणाऱ्या कै. बाबूराव पेंटर व श्री. शांताराम या दोन श्रेष्ठ सिनेदिग्दर्शकांचा परिचय, त्यांच्या कलेचें आणि त्यांच्या यशाचें मर्म उकलून सांगण्यास फारच उपयुक्त ठरेल. कै. गोविंदराव टेंबे हे तर गायक, वादक, नट, नाटककार आणि वाग्गेयकारहि ( The poet and composer ). ललित-कलांच्या रंगांत स्वतः जीवनभर विहार करणाऱ्या या रंगदार रसिकाग्रणीला श्री. देसाई येथे कसे विसरतील ! टेंब्यांविषयी लेखकाला वाटणारा आदर पुढील श्रद्धांजलींत मोठ्या मार्मिकतेने व्यक्त झाला आहे. श्री. देसाई लिहितात, " गायनांत अनुनासिकता हिणकस समजतात; परंतु सुयोजित अनुस्वारांचा संपूर्ण उच्चार गायनाची नादमधुरता वाढवितो. गोविंदराव टेंबे या नांवाच्या उच्चारांतील अनुस्वारांचा ठळकपणा लक्षांत घेतला म्हणजे गोविंदरावांच्या मृत्यूने संगीतांतील अनुस्वार निघून गेला असें म्हणावेसें वाटतें.''

श्री. देसाई हे एक बहुश्रुत रसिक आहेत. स्वतः ते नाटककारहि आहेत. भाषेच्या दृष्टीने त्यांच्या शैलींत एक तऱ्हेचा खुसखुशीतपणा व रोचकता असल्यामुळे त्यांनी लिहिलेल्या व्यक्तिचित्रांतून मधून मधून विनोदाचाहि चांगलाच परिपोष झालेला आहे. त्यांच्या उपरोधांतहि बोचकपणापेक्षा खेळकरपणाचाच भाग अधिक असल्याचें दिसेल. झटपट रंगारी पद्धतीने बनलेल्या व बनणाऱ्या गायकांसंबंधी ते लिहितात : ''असे महाशय, सुधारलेल्या मुली ज्याप्रमाणे

लिप्स्टिक बरोबर घेऊन हिंडतात त्याप्रमाणे अर्धें हळकुंड खिशांत बाळगूनच समाजांत हिंडत असतात." संगीताच्या सुकोमल राजवटींतहि प्रसिद्ध पावलेल्या वझेबुवांच्या गायकीच्या 'शक्ति पूजे'चेंहि त्यांनी मोठें मार्मिक व विनोदी वर्णन केलें आहे; मात्र 'बुवांची शक्ति नसतांना त्यांच्या गायनाचें एखादा शिष्य नुसतें व्यंगचित्र काढूं लागला म्हणजे विषाद वाटतो' हेंहि ते निर्भीडपणें सांगून टाकतात. मात्र एके ठिकाणीं "'विनायकराव तीस वर्षांपूर्वी कसे गात होते,' असें जर मला कोणीं विचारलें तर मी सांगेन, 'अगदी हुबेहूब आजच्यासारखेच!'" या लेखकाच्या निरागस लेखनाचा अर्थ मोठा गमतीचा आणि चिन्त्य होऊन बसला आहे!

'राग-रंगा'चें एकंदर हें असें स्वरूप आहे. कलावंतांच्या व्यक्तिदर्शनाची ही रंगदार बैठकच आहे. अर्थात् बैठकीसाठी पानसुपारी म्हणून प्रत्येक कलावंतासंबंधी एक एक मार्मिक आठवण (अनेकांच्या मदतीने गोळा करून) प्रत्येक व्यक्तिचित्राच्या प्रारंभीं उठावदारपणें निराळी छापून प्रकाशक श्री. अनंतराव लिमये यांनी पुस्तकाच्या आकर्षणांत भरच घातली आहे. विशेषतः फैयाजखाँविषयींची 'निषाद और षड्ज आपुकमापुक हैं' ही आठवण तर लाख मोलाची आहे.

शेवटीं 'राग-रंग' वाचून जो एक, थोडाफार अस्वस्थ करणारा विचार मनापुढे येतो तो येथे सांगावासा वाटतो. श्री. देसाई यांनी या पुस्तकांत वर्णिलेल्या दिवंगत व विद्यमान कलावंतांबद्दल व त्यांच्या कलांबद्दल आजच्या १९६० मधल्या वाचकांना कितपत आकर्षण वा आस्था आहे हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. १९३९ मध्ये प्रसिद्ध झालेलें लेखकाचें 'कलावंतांच्या सहवासांत' या पुस्तकाचें अशाकरिता त्या वेळीं स्वागत झालें की, त्यांत वर्णिलेले बहुतेक कलावंत आपल्या कलांचें प्रदर्शन मोठ्या वैभवाने आणि दिमाखानें करीत लोकांच्या डोळ्यांसमोर होते. अनेक कलावंतांच्या कलांचा–जरी ते त्या वेळीं उतारवयाकडे झुकूं लागले होते तरी–तारुण्यांतला बहर त्या रसिकांच्या स्मरणांत ताजा असल्यासारखा होता. शिवाय संगीताच्या मैफली, नाटकांचे प्रयोग इत्यादींमध्ये बेहोषीने रस घेणाऱ्या रसिकांचा तो स्वास्थ्यसमृद्धीचा जमानाच निराळा होता. आज स्वास्थ्यहि नाहीं व अभिरुचीलाहि एकदम निराळेंच वळण लागलेलें दिसून येतें. जुन्या जमान्यांतले लोक नव्या पिढीला पाहावयाला मिळाले नाहींत, व जुन्या काळचे जे मातबर लोक आज आहेत त्यांच्याहि ठिकाणीं काळाच्या किमयेमुळे वा अन्य कोणत्या कारणाने कलांचें तेज उरलें नाहीं. जुनीं माणसें आज नव्यांना सर्व दृष्टींनी निष्प्रभ व अनाकर्षक वाटत आहेत. 'तीन तपांपेक्षा अधिक काळ लोटल्यामुळे केशवराव भोसल्यांसारख्या महाराष्ट्राच्या कलाजीवनांतील एका तेजस्वी नटाचें फारसें स्मरणहि लोकांना राहिलें नाहीं हा कालमहिमा' असे मोठे कष्टीपणाचे उद्गार स्वतः लेखकानेच काढले आहेत. त्यांनीच लिहिल्याप्रमाणे "खानदानी संगीताचा सिनेमा-संगीत आणि भावगीतांसारख्या 'पानदानी' संगीताने पराभव केलेला आहे." नव्या पिढीचीं दैवतें निराळीं आहेत; तिच्या रुचीला वेगळें वळण मिळालेलें स्पष्ट आहे; आणि एकंदर 'जमाना'च पालटला आहे. अशा परिस्थितींत या सर्व कलावंतांना केवळ एक ऐतिहासिक महत्त्वच उरलें आहे की काय असा विचार मनांत येतो; आणि 'महायुद्धापूर्वी आपण स्वप्नांत होतों की आता स्वप्नांत आहोंत' असा प्रश्न लेखकाप्रमाणेच जुना जमाना पाहिलेल्या जाणकार रसिक वाचकाला पडतो. ● ● ●

वि. वि. पटवर्धन

## माझे समकालीन

विदग्ध मराठी वाचकाला श्री. काकासाहेब गाडगिळांच्या लिखाणांचें त्यांच्या वैशिष्ट्य-पूर्ण जीवनानुभवामुळे व ते व्यक्त करण्याच्या वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीमुळे नेहमीच आकर्षण वाटत आलेलें आहे. या आकर्षणाचा ठाव घेतांना अनेक घटक ध्यानांत येतात. सामान्यांच्या मनांत राजेन्द्रबाबू, राजाजी, वल्लभभाई यांच्यासारख्याविषयी त्यांच्या निकट सहवासाचा लाभ झालेल्यांकडून खूप ऐकण्याची सुप्त इच्छा नेहमीच असते. राजकीय जीवनांत वांट्याला येणारे चढउतार त्यांतील जवळून अनुभव घेतलेल्या व्यक्तींकडून ऐकतांना 'युद्धस्य कथा रम्या' असा आनंद होत असतो (त्यांत काकासाहेबांचें मन सामान्याच्या छोट्या-मोठ्या कुतूहलाची, वृत्तीची, जाणीव असलेलें आहे). राजकीय, सामाजिक व कौटुंबिक जीवनांतील अनुभवांची संगति जोडण्याचा त्यांचा प्रयत्न जिवंतपणाची प्रतीति देत असतो. रसिकवृत्तीने ललित साहित्याचा आस्वाद घेतल्यामुळे तयार झालेली संदर्भयुक्त भाषाशैली आणि खट्याळ विनोद-मिश्रित मिस्किलपणा यांची त्या जिवंत अनुभवांना जोड मिळते. पुराणांतील, बखरींतील व आधुनिक वाङ्मयांतील शब्द मोठ्या ताजेपणाने काकासाहेब वापरतात. यामुळे काकासाहेबांचें सामान्य लिखाणहि किमान वाचनीयतेचा गुण घेऊन येतें.

श्री. काकासाहेबांच्या 'माझे समकालीन'मध्ये दहा व्यक्तिचित्रें आहेत. या दहाहि व्यक्ति देशाच्या भाग्याच्या चढउताराच्या काळांत मार्गदर्शन करणाऱ्या आहेत. हीं चरित्रें 'परमपवित्रें सादर वर्णावीं' अशींच आहेत. परंतु काकासाहेबांचा हेतु केवळ चरित्रें सांगण्याचा नाही. त्यांचीं शब्दचित्रें उभीं करावींत, त्यांच्याशीं संबंधित असलेल्या महत्त्वाच्या राजकीय व सामाजिक जीवनांतील घटनांची उकल करून दाखवावी, समज-अपसमजांचें निराकरण करून दाखवावें, क्वचित् इतरांच्या थोरवीशीं तुलना करावी असे अनेक हेतु दिसतात. वाङ्मयीन सौंदर्याच्या दृष्टीने विचार करतां हें मिश्रण परिणामाची एकसंधता व विशुद्धता टिकविण्याच्या दृष्टीने कांहींसें हानिकारक झालें आहे. उदाहरणार्थ, टिळकांवरील लिखाण थोडीशी सर्वांनाच माहीत असलेली चरित्रवजा माहिती व काकासाहेबांचें त्यांच्या जीवनावरील गौरवपूर्ण भाष्य देण्यांतच संपलें आहे (त्यांत टिळकांना समकालीनहि म्हणतां येणार नाही). गांधीजींवरील लेख त्यांचें पहिलें व अखेरचें दर्शन सांगून संपविला आहे. केळकरांवरील लेख बहुतांशीं त्यांच्या राजकीय भूमिकेचें मूल्यमापन करणारा असूनहि त्यांत व्यक्ति म्हणून व साहित्यिक म्हणूनहि केळकरांचें दर्शन घडविलें आहे. कांही व्यक्तिचित्रांत हृद्य आठवणी व स्वानुभवहि आले आहेत. म्हणजे वेळोवेळीं स्फुट स्वरूपांत कारणपरत्वें झालेल्या लिखाणाचा थोडासा विस्कळीत असाच हा संग्रह आहे. त्यामुळे एकेक सुट्या व्यक्तिचित्राचा विचार करावा लागतो.

सरदारांच्यावरील लेख काकासाहेबांनी विशेष आत्मीयतेने लिहिलेला आहे. "ज्यांच्याजवळ साहस आहे पण सहानुभूति नाही, निर्णय आहे पण न्याय नाही, मनुष्य-खेळांतील प्यादें आहे,पण जो प्रिय नाही, जो उपयुक्ततेचा व्यापारी आहे पण मानवतेचा पुजारी नाही, हें भाष्य

---

**माझे समकालीन**– [ लेखक : श्री. न. वि. गाडगीळ; प्रकाशक : व्हीनस बुकस्टॉल; किंमत ४ रु. ]

त्या 'पोलादी पुरुष' या शब्दावर केलें जातें तें भाष्य अक्षरशः खोटें आहे " असें ते आवेशाने व तळमळीने लिहितात. अनेक वर्षांचे पूर्वग्रह १९३० नंतर कसे नाहीसे होत गेले हें सांगतांनाच काकासाहेब सरदारांच्या इतरांशीं असणाऱ्या तात्त्विक मतभेदांचे उल्लेख करतात व नेहरू–पटेल मतभेदावरहि प्रकाश पडतो. त्याचप्रमाणे सत्ताधारी सरदारांच्या कर्तृत्वाची चमक मोकळेपणाने काकासाहेबांनी मांडली आहे. या सर्व विवेचनांत त्यांच्या भाष्याला व भाषेलाहि आलेलें वजन वाचकाला गुंगवून ठेवतें. राजाजींच्या बुद्धिप्रधान, तर्क-प्रधान स्वभावांतून त्यांच्या जीविताचें व कार्याचें केलेलें मूल्यमापन आज तर विशेष उद्-बोधक आहे. केळकरांच्यावरील प्रदीर्घ लेखांत काकासाहेबांच्या मिस्किल शैलीला गंभीर मूल्यमापनाच्या जोडीने थोडीशी जागा मिळालेली आहे. राजेन्द्रप्रसादांच्या सुसंस्कृत व वैराग्य-शील व्यक्तित्वाची थोरवी बहुतांशी त्यांच्या चरित्राच्या अनुषंगाने काकासाहेबांनी सांगितली आहे आणि शेवटीं 'विद्या आणि विनय यांचा सुंदर संगम म्हणजे राजेन्द्रबाबू, अध्यात्म आणि आचार यांचा सहवास म्हणजे राजेन्द्रबाबू, समतोलत्व राखून श्रेष्ठ जीवनाचा संदेश देणारा सत्पुरुष म्हणजे राजेन्द्र,' अशी त्यांच्या सात्त्विकतेच्या सहवासाची धुंदी त्यांनी वर्णन केली आहे. सावरकरांवरील लेखांत मात्र (जिव्हाळ्याच्या परिचयाचा अभाव असल्यामुळे असेल) गाडगिळांनी या उपेक्षित मानकऱ्याच्या जीवनाची कांहीशी वेगळी कहाणी फक्त सांगितली आहे. "तत्त्वान्वेषी, सत्यान्वेषी, जीवनान्वेषी" विनोबांच्या साहित्याने व सहवासाने गाडगिळांच्या मनांतील श्रद्धेला आवाहन मिळालें आहे. सरदारांच्याहूनहि अधिक वादग्रस्त जीवन असलेल्या मौलाना आझादांवरील लेख त्यांची विद्वत्ता, व्यवहारी वृत्ति, हिंदु-मुस्लिम ऐक्यावरील दृढ निष्ठा सांगणारा असून, त्यांत गाडगिळांची वादग्रस्त व्यक्तींच्या कार्याचें मूल्य-मापन करण्याची पद्धति विशेष उल्लेखनीय आहे. गाडगीळ लिहितात, "कुठल्याहि माणसा-संबंधी लिहावयाचें झाल्यास क्षणिक अथवा तात्कालिक लोकमताचा हवाला न घेतां लिहिणें हें न्याय्य व योग्य आहे. जें तात्पुरतें तें चिरकालीनापासून दूर केलें पाहिजे, लहरीला वृत्ती-पासून अलग समजलें पाहिजे. सामान्य काय आणि अपवाद काय जाणलें पाहिजे." शेवटचें नेहरूंचें व्यक्तिचित्र रंगवतांना त्यांनी मोठ्या सफाईदार व सूचक शैलीने नेहरू व सरदार पटेल यांच्या जीवनाची व कार्याची तुलना केली आहे. "प्रस्तुत प्रयत्नांत केलेली टीका मित्राची आहे व गुणग्राहकता टीकाकाराची आहे" असें आपली भूमिका स्पष्ट करतांना गाडगीळ लिहितात.

व्यक्तिचित्रांत वर्णन केलेल्या घटना किंवा त्यावरील भाष्य यावर चर्चा करण्याचा अधिकार राजकारण-तज्ज्ञांचा आहे. त्या दृष्टीने या पुस्तकाचा अभ्यास केलाहि जाईल; पण गाडगिळांनी प्रस्तावनेंत दिलेल्या ग्वाहीचा प्रत्यय आणि त्यांच्या लिखाणांतील सुरुवातीला उल्लेखिलेले गुण यामुळे 'माझे समकालीन' उद्बोधनाचा आनंद दीर्घकाळ देत राहील. लेखकाच्या व्यक्तित्वांतून आलेले वाङ्मयीन गुण व व्यक्तित्वाचें घडणारें दर्शन त्यांतील रम्यतेच्या छटा वाढवीत राहील. या सर्व थोरांच्या मनाची व त्यांच्या भोवतालच्या विशिष्ट-कालीन परिस्थितीची कल्पना त्यांच्या स्वतःवरील परिणामांच्या, संस्कारांच्या अनुषंगाने गाडगीळ सांगतात त्यामुळे थोरांच्या सहवासाचा आनंद वाचकालाहि मिळत राहील. ● ● ●

सरोजिनी कुलकर्णी

अनुक्रमणिका

## जिजामाता

श्रीछत्रपति शिवाजीमहाराज हे महाराष्ट्राचें दैवत; आणि या दैवताचें परम दैवत म्हणजे श्रीजिजामाता— महाराजांची मूर्तिमंत प्रेरणा, श्रद्धास्थान आणि विसावा—साउली. असें असूनहि राजमाता जिजाबाईसाहेब यांच्या नांवावर स्वतंत्रपणें नोंदतां येतील अशा फारशा महत्त्वाच्या ऐतिहासिक घटना नाहीत. त्यामुळे त्यांचें असें वेगळें चरित्र भरघोसपणें लिहिण्याइतपत सामग्री उपलब्ध नाही. म्हणून त्यांचीं अशीं स्वतंत्र चरित्रें मराठींत अगदीं थोडींच लिहिलीं गेलीं आहेत; आणि तींसुद्धा त्रोटक आणि कल्पनेची भर घालून सजविलेलीं. अशा परिस्थितींत तत्कालीन इतिहासांतील संबंधित माहितीचे सुवर्णकण साक्षेपानें वेचून व त्यांना उचित कल्पनेची जोड देऊन सदर पुस्तिकेचे लेखक श्री. दीक्षित यांनी हें छोटेखानी चरित्र मराठी वाचकांस सादर केलें आहे. या चरित्राच्या प्रकाशनाला आजचा काल फार अनुकूल आहे; आणि त्याची सजावट लेखकाने मोठ्या भक्तिभावाने, रसिकतेने आणि कौशल्याने केली आहे. त्यामुळे या चरित्राचें स्वागत फार चांगलें होईल यांत शंका नाही.

जिजाबाईच्या चरित्राला त्यांचे पिते जाधवराव, पति शहाजीराजे आणि पुत्र शिवाजीमहाराज यांच्या चरित्राची आणि कर्तृत्वाची पार्श्वभूमि आहे. म्हणून दीक्षितांनी याच क्रमाने जिजाबाईचें बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य या तीन अवस्थांतील त्यांचें चरित्र वर्णून त्यांची एक सलग व्यक्तिरेखा वाचकांसमोर उभी केली आहे. ती करण्यासाठी त्यांनी तत्कालीन इतिहास, सभासद-बखर, चिटणीसकृत शिवचरित्र, परमानंदाचें शिवभारत आणि आधुनिक संशोधकांनी जमा केलेली सर्व सामग्री जमेस धरून कणाकणांनी गोळा केली आहे आणि त्यांतून जिजामातेची ‘ ठसठशीत व रसरशीत मूर्ति ’ घडविली आहे. या मूर्तीची बैठक म्हणून ‘ अनाचार व अवतार ’ आणि ‘ जिजाऊचें माहेर ’ हीं दोन प्रकरणें मोठ्या उद्बोधक पद्धतीने दीक्षितांनी लिहिलीं आहेत.

‘ रंगपंचमीचा बेरंग ’, ‘ कन्या सासुऱ्याशी जाये ’, ‘ शिवजन्म ’ इत्यादि प्रकरणें कादंबरीसारखीं मनोरंजक वठलीं असून त्यांत तत्कालीन काव्याचे उतारे चपखल बसविले आहेत. तसेंच अफजलखानाचा वध ( उसनें संभाजीचें घ्यावें ), आग्र्याहून सुटका, त्यानंतर शिवाजी–जिजाई भेट, शिवराज्याभिषेक आणि अखेर या प्रकरणांत इतकी भावनात्मकता उतरली आहे की, ती वाचतांना सहृदय वाचकांना गहिवर आल्यावाचून रहात नाही.

वरील प्रकरणें सजवितांना समर्थ रामदासांचे उतारे, राजव्यवहारकोश, शिवभारत, अज्ञानदासाचा पोवाडा यांतील समर्पक अवतरणांचा उपयोग केला आहे.तो रसपरिपोषक झाला आहे. पण खरेशास्त्री यांच्या ‘ शिवसंभव ’ नाटकांतील जिजाईच्या डोहाळ्यांचें गाणें ( अजि हौस जिजीची पुरवा ) आणि नाशिकचे कवि गोविंद यांनी रचलेला शिवाजीचा पाळणा ( पृष्ठ ४९–५० ) हीं दोन आधुनिक अवतरणें मात्र थोडेंसें वैरस्य उत्पन्न करतात. जिजामातेचीं कांही पत्रें ( कांही तिने स्वतः लिहवून घेतलेलीं व कांही तिच्यासंबंधी ) शेवटीं देऊन दीक्षितांनी चरित्राच्या ऐतिहासिकतेला चांगली पुष्टि आणली आहे.

सारांश, जिजामातेबद्दल मिळवतां येईल तेवढी सर्व माहिती जमवून व तिचा कौशल्याने उपयोग करून दीक्षितांनी महाराष्ट्राच्या या राजमातेबद्दलचें कुतूहल पूर्ण केलें आहे. आजच्या

---

**जिजामाता** –[ लेखक : **श्री. म. श्री. दीक्षित**; प्रकाशक : **बा. शा. इनामदार**, इनामदार बंधु प्रकाशन, ९९१ सदाशिव, पुणें २; पृष्ठें ९६ क्राऊन आकार, मूल्य २ रुपये. ]

अनुक्रमणिका

सर्वसामान्य वाचकास व विशेषत: विद्यार्थिवर्गास हें रसाळ चरित्र खात्रीने स्फूर्तिदायक होईल यांत शंका नाही. ● ● ●

के. ना. वाटवे

## शिकारीच्या सत्यकथा

मृगया ही सर्व प्राण्यांची सहजप्रवृत्तीच होय. किंबहुना 'जीव जीवांचें जीवन' हा सृष्टीचा स्वभावधर्मच आहे. मानवापेक्षा खालच्या वर्गातील प्राण्यांच्या बाबतींत वरील स्वभावधर्म जरी अद्याप प्रकर्षाने दिसत असला तरी मानवाने या मृगयेला एका कलात्मक आनंदाचें स्वरूप प्राप्त करून दिलें आहे. कलेप्रमाणेंच क्रीडा हा मृगयेचा स्थायीभाव आहे. फरक एवढाच की, मृगया हा एक 'मर्द-खेळ' आहे. हा 'मर्दाचा खेळ' खेळण्यांत एक विलक्षण आनंद आहे, आणि तो खेळ पाहण्यांतहि मौज आहे. मात्र 'शूर मर्दाचा पोवाडा' जसा 'शूर मर्दानेच गावा' तशी या 'मर्द-खेळा'ची कथाहि सांगण्यास ती क्षात्रवृत्तीच हवी. श्री. मो. रा. वाळंबे हे स्वत: 'बंदुके' किंवा 'बल्लखनदार' नसले तरी बंदुकीने सावज जसें नेमकें टिपावें तसें या शिकारीच्या खेळांतील रोमहर्षक अनुभव त्यांच्या लेखणीने साक्षेपाने टिपले आहेत.

कोल्हापूरच्या परिसरांत शिकाऱ्यांच्या सहवासांत वावरतांना शिकाऱ्यांच्या बंदुकांप्रमाणे लेखकाने आपली चिकित्सक वृत्ति सारखी जागती ठेवली असल्याचें या कथासंग्रहांत पानोपानीं दिसून येतें. विविध प्राण्यांच्या लकबी, त्यांचे स्वभावधर्म, त्यांचीं ठिकाणें, त्यांच्या शिकारीच्या वेळीं घ्यावी लागणारी दक्षता यांकडे लेखकाचें विशेष लक्ष आहे. 'जंगलांतील जनावरांत समंजस व सहसा उपद्रव न देणारा प्राणी म्हणजे वाघ', 'रानडुक्कर मोठं मानी जनावर आहे,' 'चित्ता चिडला म्हणजे माणसाला फाडून टाकतो; पण नरमांसभक्षण करीत नाही तो', 'कोळशिंदा फार हुशार जनावर, माणसासारख्या शिळा घालून जंगलांत ते हाका घालतात व शिकार करतात', इत्यादि वाक्यें त्या प्राण्यांचा परिचय थोडक्यांत करून देतात; आणि म्हणूनच 'शिकारीच्या सत्यकथा' वाचतांना तंत्राबरोबर शिकारीचा मंत्रीहि वाचकांच्या मनांत रुजतो.

या शिकारकथांत एकूण अकरा शिकारकथांचा समावेश लेखकानें केला असला तरी पांचच शिकारी त्याने स्वत: पाहिलेल्या आहेत. बाकीच्या शिकार-कथांतून लेखकाने शिकाऱ्यांचे अनुभव पुनर्निवेदित केलेले आहेत. श्री. फडतरे, व्यंकटेश माडगूळकर यांच्या शिकारकथांतून शिकाऱ्यांचा 'औरस' अनुभव वाचावयास मिळाल्याचें समाधान वाचकांना मिळतें. श्री. वाळंबे यांचा अनुभव कांहीसा 'दत्तक' असल्याने आवश्यक तें सामरस्य आणि चित्तथरारकता वाचक अनुभवूं शकत नाही. पण स्वत: लेखकानेच आपली भूमिका प्रारंभीं स्पष्ट केली असल्याने या उणीवेची तीव्रताहि कमी होते.

शिकारीच्याच परिभाषेंत सांगायचें झालें तर श्री. वाळंबे यांनी 'शिकारीच्या सत्यकथा' लिहून 'एकाच दगडांत दोन पक्षी पाडण्याची' कामगिरी केली आहे. त्यांच्या शिकारी मित्रांचे मूक अनुभव त्यांनी मुखर केले ही पहिली कामगिरी आणि ते अनुभव मराठी वाचकांच्या 'हातांत' आणून दिले ही दुसरी कामगिरी. ● ● ●

प्र. ल. गावडे

**शिकारीच्या सत्यकथा** – [ लेखक : मो. रा. वाळंबे; प्रकाशक : गो. य. राणे; पृष्ठसंख्या ८६, मूल्य दोन रुपये. ]

## वडिलांचे सेवेसी

' वडिलांचे सेवेसी ' हें कुतूहल-जनक नांव धारण करणारा हा एक चरित्र-ग्रंथ आहे. यांत एकच चरित्र नसून तीन चरित्रांचा एक त्रिवेणी-संगम आहे. आपापल्या क्षेत्रांत चमकून गेलेल्या, गोरेगांवच्या एकाच जोशी कुटुंबांतल्या तीन बंधूंचीं — महादेव मल्हार, नारायण मल्हार आणि वामन मल्हार यांचीं—हीं एकत्र लिहिलेलीं चरित्रें आहेत. चरित्रलेखकहि याच कुटुंबांतले आहेत. ते म्हणजे महादेव मल्हारांचे चिरंजीव व नारायण मल्हार आणि वामन मल्हार यांचे पुतणे, ग्वालेर येथील कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक. चरित्र-नायक आणि चरित्र-लेखक यांचा झालेला हा ' समसमा ' संयोग मराठींत लक्षणीय होय यांत शंका नाही.

वरील तीन बंधूंपैकी महादेव मल्हार यांचें चरित्र यापूर्वीं कोणीं लिहिलेलें नाही. उरलेल्या दोघांचीं चरित्रें यापूर्वीच लिहिलेलीं आहेत. वामन मल्हारांचें प्रि. ना. म. पटवर्धन यांनी आणि नारायण मल्हारांचें श्री. वि. कृ. जोशी यांनी. तथापि या तीन चरित्रनायकांचे एक-मेकांशीं निगडित असलेले जिव्हाळ्याचे संबंध ध्यानीं घेऊन त्यांच्या सान्निध्यांत वाढलेल्या त्यांच्या विद्वान् आणि व्यासंगी पुत्राने आणि पुतण्याने त्यांच्या चरित्रांच्या धाग्यांची एकत्र गुंफण करणें याला कांही वेगळें वैशिष्टय आणि औचित्य आहे.

हीं तीन चरित्रें एकत्र लिहिलीं आहेत याचा अर्थ एकमेकांत मिसळून लिहिलीं आहेत असा नव्हे, तसें करणें शक्य नव्हतें व इष्टहि झालें नसतें.कारण हे तिघे बंधु सारखेच कर्तबगार असले तरी त्यांचीं कार्यक्षेत्रें भिन्न असल्याने, कांही कालानंतर, त्यांच्या जीवनप्रवाहांना निराळीं व वेगवेगळीं वळणें लागलीं होतीं. आपल्या वडिलांच्या गांवीं—गोरेगांव, तालुका माणगांव, जिल्हा कुलाबा—या तीन बंधूंचा जन्म व त्यांचें प्राथमिक शिक्षण वडिलांच्या देखरेखीखाली पुरे होई-पर्यंतचा जोशी कुटुंबाचा वृत्तान्त तिघांनाहि समान असल्याने तो मात्र एकाच ' पूर्वपीठिका ' या पहिल्या प्रकरणांत सांगण्यांत आला आहे व यापुढे थोरले महादेव मल्हार, मधले नारायण मल्हार व धाकटे वामन मल्हार यांचें जीवन वेगवेगळें चित्रित केलें आहे. तरीसुद्धां कौटुंबिक संबंधांनी त्यांचें जीवन परस्पर-निगडित असलेलें सर्वत्र वर्णिलें आहे. याप्रमाणें या तीन चरित्रांत एकता व भिन्नता यांचा योग्य संगम झालेला आहे.

महादेव मल्हार ( अण्णा ) हे गुजराथेंत जुनागडच्या बहाउद्दिन कॉलेजमध्ये संस्कृ-तचे प्राध्यापक होते. ते उत्तम शिक्षक, रसाळ वक्ते व तत्त्वचिंतनपर निबंधांचे लेखक होते. त्यांचीं ' आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त ' आणि ' स्वामी सच्चिदानंदांचे विचार' हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध आहेत. ते उदार, श्रद्धाळू आणि परोपकारी होते. वडिलांच्या मागे त्यांनीच आपल्या दोन बंधूंस आधार देऊन कुटुंबाचा योग्य प्रतिपाल केला ( १८७२–१९२८ ).

नारायण मल्हार ( नाना ) हे सर्व्हंट्स् ऑफ इंडिया या संस्थेचे आजीव सभासद, कामगारांच्या चळवळीचे आद्य प्रवर्तक, केन्द्रीय कायदेमंडळाचे पंचवीस वर्षें सदस्य आणि आंतरराष्ट्रीय कामगारसंघटनेमध्ये हिंदी कामगारांचे प्रतिनिधि होते. दोनीहि बंधूंच्या मानाने त्यांचें कार्यक्षेत्र व्यापक आणि कर्तबगारी दूरगामी—अखिल भारतीय होती (१८७९-१९५५).

वामन मल्हार ( तात्या ) हिंगणें येथील महिला विद्यापीठाचे आजीव सदस्य, मराठी कादंबरीच्या एका युगाचे प्रवर्तक, श्रेष्ठ तत्त्वचिंतक आणि थोर साहित्यिक होते. त्यांनी घस व

**वडिलांचे सेवेसी**–[ लेखक व प्रकाशक : **प्रा. अ. म. जोशी**, 'लक्ष्मी' बंगला, ७८९ शिवाजीनगर, पुणें ४; पृष्ठें २८५ क्राऊन आकार, मूल्य ६ रुपये. ]

देहदंड सोसून राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार केला होता व अप्रियता पत्करून ते समाजसुधारणेचा पाठपुरावा करीत. वामनराव म्हणजे चिकित्सकपणा व बुद्धिप्रामाण्य यांचा एक महाराष्ट्रीय नमुनाच ( १८८२–१९४३ ).

याप्रमाणे आपापल्या क्षेत्रांत नांव घेण्याजोगी कामगिरी करून या तीनहि जोशीबंधूंनी महाराष्ट्राच्या जीवनावर चिरंजीवी संस्कार केलेले आहेत. म्हणून सदर चरित्रांच्या लेखकांनी केवळ एक कौटुंबिक कार्य किंवा 'वडिलांची सेवा' वजावली आहे असें नसून या चरित्रांच्याद्वारे त्यांनी महाराष्ट्राची आणि मराठीचीहि सेवा केली आहे याबद्दल कोणाचें दुमत होणार नाही.

एक नमुनेदार चरित्र-ग्रंथ या दृष्टीनेहि या चरित्रांचा क्रमांक बराच वरचा आहे. सदर चरित्रांची व्याप्ति चरित्र-नायकांच्या कार्याची चांगली कल्पना देण्यास पुरेशी आहे. भाषा साधी, सोपी, अकृत्रिम आणि ओघवती आहे. चरित्रांत सर्वत्र आटोपशीरपणा आणि प्रमाणबद्धता आहे. चरित्रलेखक प्रा. अ. म. जोशी यांनी चरित्र-लेखनावर एक पुस्तक मागे लिहिलें आहे. आदर्श चरित्र कसें असावें हें सांगणें सोपें असतें; पण तसें चरित्र स्वतः लिहून दाखविणें मात्र अवघड आहे. पण ही अवघड कामगिरी प्रा. जोशी यांनी यशस्वीपणाने पार पाडली आहे. चरित्रनायक स्वकीय असणें ही गोष्ट एका दृष्टीने अडचणीची व दुसऱ्या दृष्टीने फायद्याची असते. अडचण ही की, आपलेपणामुळे गुणांवरच कळत नकळत भर दिला जाऊन दोषांकडे कानाडोळा होतो व तें लिखाण एक 'महिम्नस्तोत्र' बनतें. पण त्यांत फायदा असतो तो असा की, लेखकास चरित्र-नायकाची माहिती जवळून आणि विपुल असते.

पण संतोषाची गोष्ट ही आहे की, चरित्रलेखकाने कलात्मक तटस्थता व संयम राखून चरित्रनायकांचीं चित्रें आहेत तशीं, गुणदोषयुक्त आणि यथार्थ रेखाटलीं आहेत व खाजगी माहितीचा उत्तम उपयोग करून घेतला आहे. त्यामुळे चरित्रें मनोरंजक आणि फार आकर्षक झालीं आहेत. चरित्र-नायकांच्या मध्यवर्ती व्यक्तिचित्रांना प्रसंग व अवांतर व्यक्ति यांच्या वर्णनाने चांगला उठाव आणला आहे. या तीन जोशीबंधूंच्या कर्तबगारीचा काळ म्हणजे एकोणिसाव्या शतकाचा शेवट व विसाव्या शतकाचा पूर्वार्ध यांच्या दरम्यानचा काळ. हा काळ म्हणजे महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक आणि औद्योगिक उत्थानाचा काळ. या काळाचे सर्व संस्कार घेऊन कार्यप्रवृत्त झालेली जी महाराष्ट्रांतील मध्यमवर्गीयांची पिढी तिचे हे जोशीबंधु प्रतिनिधि. या दृष्टीनेहि या चरित्रांकडे पाहिलें असतां त्यांत त्या काळचे पडसादहि चांगले उमटले आहेत असें दिसून येईल.

चरित्रनायकांच्या व्यक्तिमत्त्वाचें दर्शनहि या चरित्रांत चांगलें घडविलें आहे. त्यांतल्या त्यांत अण्णांचें व्यक्तिमत्त्व अधिक घसघशीत व उठावदार दिसतें. श्रद्धाळू, रसिक, भावनाप्रधान, आवेशी असे अण्णा वाचकांच्या नजरेसमोर उभे राहतात. त्यांचें व्यक्तिमत्त्व एकेरी आहे, तर तात्यांचें आहे संमिश्र ( complex ); पण तेंहि चांगलेंच जिवंत वठलें आहे. नानांचें व्यक्तिदर्शन मात्र पुसट वाटतें याचें कारण त्यांच्या चित्रीकरणाला प्रसंगांपेक्षा शब्दांचाच जास्त उपयोग करण्यांत आलेला आहे. याचें कारण नानांचा सहवास व सान्निध्य लेखकाला तितक्या प्रमाणांत मिळालेलें नसावें.

'चरित्र-लेखनाच्या कलेला बाधक' म्हणून विशेषतः तात्यांच्या लेखनाची स्वतंत्र चर्चा त्यांच्या चरित्रांत केलेली नाही हें ठीक. कारण मग चरित्राला ग्रंथसमीक्षेचें स्वरूप आलें असतें; पण विशेषतः तात्यांच्या कादंबऱ्यांतील व कथांतील पात्रांना व प्रसंगांना तात्यांच्या अनुभवांतील कोणत्या अंशांचा उपयोग झाला हें जर चरित्रलेखकाने तात्यांस विचारून घेऊन जरूर त्या

सावधगिरीने दिलें असतें तर कलाकृतीच्या पडद्यामागील हा भाग कादंबऱ्यांच्या अभ्यासकांना मनोरंजक आणि बोधप्रद वाटला असता.

'ते तिघे आणि आम्ही' हें शेवटचें प्रकरण समारोपात्मक आहे. त्यांत चरित्रनायकांच्या व्यक्तिचित्रांवर शेवटचा हात ( Finishing Touch ) फिरविला असून त्यांच्या पुढच्या पिढीवर त्यांचे कोणते संस्कार झाले व ती पिढी हल्ली कोणत्या अवस्थेत आहे याचें वर्णन आहे. स्वतः आपण व आपले सख्खे व चुलत बंधु यांबद्दल लिहिणें जरा नाजूक आहे. तथापि हीहि कामगिरी चरित्रलेखकाने मोठया संयमाने, प्रांजलपणें आणि विनयाने पार पाडली आहे.

तात्पर्य, कलात्मकता, व्यासंग, उचित वृत्ति आणि परिश्रम यांनी नटलेलें हें त्रिवेणी संगमात्मक चरित्र लिहून प्रा. अ. म. जोशी यांनी मराठींतील चरित्रवाङ्मयांत मोलाची भर घातली आहे याबद्दल वाचक त्यांना धन्यवाद देतील. ● ● ●

के. ना. वाटवे

## पुरुषोत्तम

ग्रामीण प्रश्नांवर सध्या मराठी वाङ्मयांतील निरनिराळ्या विभागांत भरपूर वाङ्मय निर्माण होत आहे. नव्हे, ती एक फॅशनच झाली आहे. पण या वाङ्मयाचें साक्षात् दर्शन झाल्याशिवाय असे प्रयत्न केल्यास ते हास्यास्पद होतात.

श्री. मो. स. साठे यांनी मात्र ग्रामीण प्रश्नांचा सखोल अभ्यास करून मगच हें नाटक लिहिलेलें आहे. त्यामुळे त्यांचा हा प्रयत्न पूर्णपणें यशस्वी झालेला आहे.

पुरुषोत्तम नाटकांतील मध्यवर्ती कल्पना तसं पाहिलं तर परिचित आहे. बुद्धिप्रधान भाऊ मास्तर आणि शक्तिप्रधान संभाजीराव यांच्यांतला संघर्ष या नाटकांत दाखविण्यांत आला आहे. संभाजीराव हा एक खेड्यांतला गुंड खुनाच्या आरोपांतून निर्दोषी सुटल्यामुळे त्याला अस्मान ठेंगणें वाटूं लागतें. रांजणवाडीचा अनभिषिक्त सम्राट् होण्याची त्याची आकांक्षा असते. भाऊ मास्तरांना त्याचें हें पूर्वचारित्र्य माहीत असल्याने ते संभाजीरावाला विरोध करतात. भाऊमास्तरांना सर्व गाव मानतो, पण संभाजीरावांना उघड विरोध करण्याचें सामर्थ्य गावकऱ्यांत नसतें. शेवटपर्यंत संभाजीरावाचा विजय होणार असें वाटत असतें. पण आयत्या वेळीं भाऊंच्या जावयाच्या-विलासच्या प्रयत्नाने पोलीस येतात व संभाजीराव आत्महत्या करतात. असें या नाटकाचें थोडक्यांत कथानक आहे.

भाऊ मास्तर, संभाजीराव, रत्ना, देवजी पाटील हीं या नाटकांतील प्रमुख पात्रें. त्यांच्या जोडीला निकम मास्तर, संताजी, चिंतुअण्णा, विजया, विलास, रमाबाई, रूपचंद, शिदू वगैरे इतर पात्रांनी नाटकाच्या यशाला हातभार लावला आहे.

या तीन अंकी नाटकांत गोळीबार, पिस्तुलें, विषाची बाटली, जाळपोळ वगैरे आवश्यक असा सर्व मसाला आहे. नाट्य आहे, कपट आहे, सर्व आहे. नाटकाची भाषा प्रसंगोचित आहे. संभाजीरावाचीं कारस्थानें खेड्यांतील गावठी पुढाऱ्याला शोभेशीं आहेत.

पण या नाटकांतला नायक भाऊ मास्तर आहे. सर्वसाधारणपणें खेड्यांतील मास्तर हा भेंड्याच्या भाजीसारखा बुळबुळीत दाखविला जातो. पण पुरुषोत्तम नाटकांतील भाऊ

पुरुषोत्तम-[ लेखक : मो. स. साठे; प्रकाशक : वि. स. साठे, इरावती ट्रेडर्स, ७५४ शुक्रवार, पुणें २; पृष्ठें ११२, मूल्य रु. २. ]

मास्तर तडफदार आहेत. त्या दृष्टीने पृष्ठ २४–२५ वरील भाऊ मास्तर व संभाजीराव यांच्यातील संभाषण वाचनीय आहे.

सकाळमध्ये प्रसिद्ध झालेल्या एका पत्राने श्री. साठे यांना नाटकाची कल्पना सुचली. पण नाटक लिहितांना त्यांनी आपला विषय महाराष्ट्रांतील एखाद्या एकाकी खेड्यापुरता मर्यादित न ठेवतां त्याची कक्षा व्यापक ठेविली आहे.

श्री. साठे यांच्या या यशस्वी प्रयत्नाबद्दल मीं त्यांचें अभिनंदन करतों. ● ● ●

अ. ह. लिमये

## नाट्य-सुगंध

प्रस्तुत पुस्तक म्हणजे नाट्यविषयक चौदा लेखांचा एक संग्रह आहे. हे लेख विविध प्रकारचे आहेत. कांही लेख रंगभूमि व नट यांच्यासंबंधी आहेत, कांही नट व नाटककार यांच्या चारित्रपर आहेत आणि कांही नाटकांच्या समालोचनपर आहेत. रंगभूमि म्हटली म्हणजे नाटककार, नट व प्रेक्षक या तिघांचा बोध होतो. प्रस्तुत पुस्तकांत प्रेक्षकांसंबंधीचा एकहि लेख नाही. प्रेक्षकांची अभिरुचि नाटकाने बदलते किंवा प्रेक्षकांची अभिरुचि लक्षांत घेऊन नाटककार नाटक लिहितो या प्रश्नांचा विचार तशा तऱ्हेच्या लेखांत करतां आला असता. लेखक शिक्षणाच्या निमित्ताने सांगली, पुणें व मुंबई या मोठ्या शहरांत वास्तव्य करीत होते. तेव्हा त्या काळचे प्रेक्षक कसे होते याविषयी त्यांना माहिती देतां आली असती. प्रेक्षकांनी नाटक शांतपणें पाहिलें किंवा नाटकाला प्रेक्षकांची गर्दी होती या साध्या घटना देखील नाटककार व नट यांच्या कलेच्या थोरवीवर प्रकाश पाडूं शकतात.

रंगभूमि व नट त्यांच्यासंबंधीच्या लेखांत लेखकांनी जी माहिती ग्रथित केली आहे, ती मराठी रंगमंचाच्या दृष्टीने मोलाची व महत्त्वाची आहे. परंतु त्या माहितीबरोबरच विवेचन हवें होतें त्याचा या पुस्तकांत अभाव आहे. इतिहास म्हटला म्हणजे त्यांत निव्वळ आंकडे, घटना व व्यक्ति नकोत. त्यांत त्या सर्वांच्या संबंधाचें ऐतिहासिक विवेचन हवें. मराठी रंगभूमि ही इ. स. १८४३ मध्ये म्हणजे हा देश पारतंत्र्यांत असतांना इंग्रजी राजवटींत उदयास आली आणि पारतंत्र्यांतच विकसित झाली याचें कारण कलेच्या विकासास जी शांतता व सुबत्ता आवश्यक असते, ती पारतंत्र्यांत आयतीच लाभली होती; आणि वतनवाडी व जहागिऱ्या आणि इनामें घालवलेल्या लोकांना एक नवा व्यवसाय पाहिजे होता. तो नाटक-मंडळयांच्या स्थापनेने निर्माण झाला होता. नव्या शिक्षणामुळे भटाभिक्षुकांचें व गवयागुरवांचें महत्त्व संपुष्टांत येत होतें. अशा प्रसंगीं त्याला अनुकूल असा नवीन धंदा हवा होता. तो अण्णा किर्लोस्करांनी उत्पन्न केला. म्हणूनच इतिहासाचार्य राजवाडे यांनी महाराष्ट्राच्या कर्त्या पुरुषांत सयाजीराव महाराज गायकवाडांच्या बरोबरीने अण्णांची गणना केली आहे.

मराठी रंगभूमीसंबंधी दुसरा एक प्रश्न उद्भवतो तो असा की, तिचा उद्भव आणि तिच्या विकासास जे नाटककार व नट कारणीभूत झाले, ते सांगली, मिरज, बुधगाव, कुरुंदवाड किंवा जमखिंडी या पटवर्धन परिसरांतच कां झाले ? या संस्थानी परिसराला लागूनच असलेल्या कोल्हापूर व कागलच्या परिसरांत ते कां झाले नाहीत ? पुन्हा या नाटक-

नाट्य-सुगंध–[ले. : काव्यविहारी; प्रस्तावना : वि. स. खांडेकर; प्रकाशक : जोशी ब्रदर्स, बुकसेलर्स ॲण्ड पब्लिशर्स, अप्पा बळवंत चौक, पुणें २; किंमत रु.३·५०.]

कारांत व नटांत एका विशिष्ट जातीचाच भरणा विशेष कां आढळतो ? या प्रश्नांची मीमांसा करतांना सांगलीला चिकटून असलेला कानडी मुलूख, त्या मुलखांतील भागवत मंडळ्या, त्यांचे मराठी मुलखांतलें आगमन, त्या वेळचे सांगलीचे अधिपति चिंतामणराव अप्पासाहेब यांची आवड, त्यांनी विष्णुदास भाव्यांना दिलेलें उत्तेजन या घटनांचें विवेचन करावें लागेल. तद्वतच या विशिष्ट संस्थानांतील सुशिक्षित व सुसंस्कृत जनतेच्या अभिरुचीचेंहि विवेचन करावें लागेल. लेखकांनी या लेखांत लहानसहान नाटक-मंडळ्या, त्यांतील सामान्यांतील असामान्य नट, त्या दोघांच्या आयुष्यांतील बारीकसारीक प्रसंग यांची माहिती मोठ्या परिश्रमाने मिळवून स्वारस्यकारक वाटेल अशा रीतीने सांगितली आहे. तिला विवेचनाची जोड मिळाली असती तर दुधांत साखर पडली असती.

कांही लेख नट व नाटककार यांच्या चरित्रपर आहेत. त्यांत देवलांवरील लेख अत्यंत आस्थेचे व महत्त्वाचे आहेत. लेखकाचा लहानपणापासून देवलांशीं ऋणानुबंध होता. त्यामुळे लेखकास देवल या व्यक्तीविषयी मुळांतच आदरभाव होता. तो आदरभाव नाटककार या नात्याने देवलांचें गुणवर्णन करतांना द्विगुणित झाला आहे. देवल हे खरोखरच थोर नाटककार, नट व अभिनयशिक्षक होते. गोविंदाग्रजांनी त्यांच्या स्तुतिपर ज्या आर्या रचल्या आहेत, त्यांत 'परि देवल ते देवल' या चार शब्दांतच 'असम' अलंकार साधून त्यांच्या अप्रतिम नाट्यगुणांचा गौरव केला आहे. त्याचप्रमाणे आपल्या 'छन्दोरचनेंत' माधवराव पटवर्धन यांनी देवलांच्या पद्यरचनेची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. देवलांच्या 'शारदे'ची गोडी तर अवीट आहे. शारदेची करुणस्थिति पाहून डोळ्यांत टचकन् पाणी येतें हें खरें; परंतु तिच्या त्या दयनीय दशेस तिचा लोभी बाप कारण आहे हें लक्षांत आलें म्हणजे धूर्तांनी व शठांनी नागवलेल्या श्रीमंत भुजंगनाथास पाहून हसावें की रडावें हें कांहीच कळत नाही. हास्य व करुण हे परस्परांना मारक असणारे रस एकाच वेळीं खेळवून देवलांनी आपल्या यशाचा परमावधि गाठला आहे. देवलांच्या विस्तृत चरित्रग्रंथाची महाराष्ट्रास अत्यंत आवश्यकता आहे. हें कार्य लेखकांनी करावें अशी माझी त्यांना प्रार्थना आहे.

कांही लेख समालोचनपर आहेत. त्यांत 'शारदें'तील 'जो लोककल्याण' हें पद आगरकरांना उद्देशून आहे किंवा टिळकांना उद्देशून आहे या विवादाची चर्चा आहे. या पदांतील 'कारागृहीं वास' या पदावरून हें पद टिळकांना उद्देशून आहे असें लेखकाचें म्हणणें आहे. मला वाटतें, हा वाद निरर्थक आहे. देवल हे गोखले, आगरकर, हरिभाऊ आपटे इत्यादि टिळकांच्या प्रतिपक्षीयांच्या गोटांतले होते ही वस्तुस्थिति आहे. आगरकरांनाहि एकदा डोंगरीला कारावास घडला होता हेंहि कांही खोटें नाही. 'कारागृहवास' म्हटला म्हणजे टिळकच समोर उभे राहतात हें कोणीहि कबूल करील; पण म्हणून देवलांनी हें पद या दोघांपैकी एकाला समोर ठेवून रचलें आहे हा मात्र दुराग्रह आहे. देवलांची भूमिका ही सुधारकी मवाळ किंवा सनातनी जहाल अशा कोणत्याहि राजकीय पक्षाच्या पुरुषाची नव्हती. ते ललित साहित्याचे निर्माते होते. 'रसोत्कर्ष' हा त्यांच्या लेखनाचा आत्मा होता. तेव्हा प्रस्तुत पद रचतांना त्यांनी कोणतीहि विशिष्ट व्यक्ति समोर ठेवली नव्हती, तर एकंदर थोर पुढारी कसे असतात हें लक्षांत वागवून मग कोणत्याहि स्थळीं व कोणत्याहि काळीं, कोणाहि श्रेष्ठ नेत्याला लागू पडेल असें हें गीत लिहिलें आहे असाच कौल द्यावा लागेल.

'कोण म्हणतो मला म्हातारा ?' या लेखांत प्रा० अप्पासाहेब फडके यांनी फाल्गुनरावांच्या भूमिकेसंबंधी जें मत प्रकट केलें आहे, तें मला मान्य आहे. ज्या मूळ नाटकावरून देवलांनी 'फाल्गुनराव' निर्माण केला आहे त्या नाटकाचें इंग्रजी नांव 'All in a wrong'

असें आहे. या नांवावरूनच पात्रांच्या स्वभावावर प्रकाश पडतो. फाल्गुनरावाला कृत्तिकेच्या शीलाचा संशय नसतो. कृत्तिका इतर पुरुषांच्या नजरेला पडली, तर ते तिला धाऱ्यांत आणतील अशी त्याची कल्पना असते. म्हणूनच तो नाटकाच्या सुरुवातीला कृत्तिकेला कोणी चिठ्ठीचपाटी आणून दिली का असा प्रश्न भाइन्यास विचारीत असतो. पुढेहि फोटोवरून अश्विनशेटाचा पत्ता लागल्यांवर तो त्याला ऐकूं जाईल अशा रीतीने ' परनार विषाचा प्याला ! तूं लागुं नको त्या नादाला ' हें गाणें गुणगुणत राहतो. यावरून त्याला आपल्या पत्नीपेक्षा इतर पुरुषांचा संशय होता हें उघड आहे. कृत्तिका कजाग असली, तरी सुंदर होती. ' काळी बायको एकाची व गोरी बायको लोकाची ' किंवा ' भार्या रूपवती शत्रु ' हें सत्य फाल्गुनराव जाणत होता. तो बिजवर असला, तरी म्हातारा नव्हता. माझ्या बायकोच्या मी जसा मुठींत आहे तसेंच इतर पुरुष तिच्या मुठींत राहतात की काय या संशयाने तो ग्रासलेला होता. कृत्तिकेला फाल्गुनरावाच्या बाइलवेडेपणाचा साक्षात् अनुभव होता. म्हणूनच ती जेव्हा त्याला घेरी आलेल्या रेवतीबरोबर पाहते, तेव्हा मनांतल्या मनांत संतापते. या प्रसंगाने तो बाईलवेडा आहे हा तिचा समज अधिक दृढ होतो; आणि पुन्हा जेव्हा दासीऐवजी तीच स्वतः बुरखा घेऊन फाल्गुनरावास बागेंत भेटावयास जाते आणि तिच्या खऱ्या स्वरूपाचा स्फोट होऊन फाल्गुनराव ' अरे ! ही तर माझी बायको ' असें उद्गारतो, त्या प्रसंगानेहि तिचा संशय बळावतो. रेवती तर बोलूनचालून नायकीणच आहे. तिने आपलें चित्र एखाद्या प्रियकराला दिलें असावें असा अश्विनशेटाला संशय यावा यांत अस्वाभाविक असें कांही नाहीं. फाल्गुनराव, कृत्तिका, अश्विनशेट या सर्वांच्या संशयांत रेवती सापडते म्हणूनच देवलांनी 'फाल्गुनराव अर्थात् तसबिरीचा घोटाळा' हें मूळ नांव बदलून या प्रहसनवजा नाटकाला पुढे ' संशयकल्लोळ ' हें काव्यमय नांव दिलें असावें. बिजवर फाल्गुनराव हा बाइलवेडा आहे, म्हातारा नाहीं.

'कीचकवध नाटकाचे टीकाकार' हा समालोचनपर लेखहि महत्त्वाचा आहे. या लेखांत लेखकांनी खाडिलकरांची वकिली करतांना जें युक्तिसंगत विवेचन केलें आहे, तें बिनतोड व कुणालाहि पटेल असेंच आहे. ' कीचकवधां'त तत्कालीन राजकारण असलें, तरी त्यामुळे त्याच्यांतील नाट्यगुणांस कोणत्याहि प्रकारचा ढळ पोचलेला नाही. ' कीचकवधां'त खाडिलकरांनी कीचकाच्या द्वारें ' अत्याचारी अधिकारी ', विराटाच्या द्वारें ' दुबळी सत्ता ', सुदेष्णेच्या द्वारें ' हुकमाची ताबेदारी ', धर्माच्या द्वारें ' परतंत्र सौजन्य ', भीमाच्या द्वारें ' नियंत्रित शक्ति ', आणि सैरंध्रीच्या द्वारें ' अरक्षित शील ' यांचीं त्रिकालाबाधित चित्रें रंगविलीं आहेत. प्रचलित राजकारणाच्या पार्श्वभूमीवर पौराणिक कथांतील पौरुषाचें पूजन करावयाचें हा तर खाडिलकरांच्या प्रतिभेचा एक विलोभनीय विशेष होता. त्यासाठी मूळ महाभारत धुंडाळण्याची कांही गरज नाही. कीचकाच्या तोंडीं असलेले ' ढालगज, शेंबडी पोर, लवंडी ' इत्यादि शब्दप्रयोगहि त्याच्या स्वभावास साजेसे आहेत. ते रसानुकूल आहेत. त्यांच्या अश्लीलतेची चर्चा करणें म्हणजे अरसिकपणाचें द्योतक आहे. खाडिलकरांच्या ' कीचकवधा'ला ब्रिटिश सरकारने जप्त केलें होतें, या एकाच घटनेवरून तें नाटक किती रसोत्कट आहे याची साक्ष पटेल.

श्री. काव्यविहारी यांचे सर्वच लेख माहितीपूर्ण व सुटसुटित आहेत. त्यांच्या भाषेंत स्वाभाविक प्रवाह आहे. त्यामुळे त्यांचे विचार सहज लक्षांत येतात. या लेखसंग्रहाने मराठी साहित्याच्या नाट्यविभागांत एका मौलिक ग्रंथाची भर पडली आहे. ● ● ●

**भवानीशंकर पंडित**

अनुक्रमणिका

## सप्रेम नमस्कार वि. वि. ( अर्थात् पत्रव्यवहारशास्त्र )

पुस्तकाच्या उपनांवावरून त्याचें स्वरूप सहज लक्षांत येतें. पत्रात्मक ग्रंथ मराठींत बरेच प्रसिध्द झाले असले तरी वैयक्तिक पत्रें कशा तऱ्हेने लिहावीं. यासंबंतच्या तंत्राचें व मंत्राचें विवेचन करणारा स्वतंत्र ग्रंथ मराठींत नव्हता. त्या दृष्टीने या ग्रंथाचें कोणीहि स्वागतच करील. पत्रव्यवहारशास्त्र म्हटलें म्हणजे पत्रलेखनाच्या विशिष्ट पध्दति कां रूढ झाल्या याची चर्चा आलीच. पत्राचे विविध भाग, मायने लिहिण्याच्या विविध पद्धति, पत्ता व दिनांक कोठे व कसा लिहावा, पत्रांची अखेरी कशी करावी वगैरेंचें विवेचन आपोआप आलेंच. पण श्री. लिमये यांनी या गोष्टी गृहीत धरलेल्या दिसतात; व पत्रलेखकाच्या अंगीं कोणकोणते गुण आवश्यक आहेत याच्या चर्चेने या ग्रंथाची आकस्मिक सुरुवात केली आहे. आकर्षकता, जिव्हाळा, वक्तशीरपणा, आटोपशीरपणा, सौजन्य, निर्दोषता वगैरे वीसएक गुणांची केलेली सोदाहरण चर्चा कोणालाहि आवडेल. मात्र 'रचना' व 'व्याकरण' हे मथळे विवेचनाला साजेसे नाहीत. पत्रें लिहितांना शाई कोणती व नोटपेपर कोणता वापरावा, व फायलींत तीं कशीं व्यवस्थित ठेवावीं याचीहि विस्ताराने चर्चा करणाऱ्या लेखकाला पत्राच्या प्रारंभाचा कसा विसर पडला याचें नवल वाटतें.

या ग्रंथांतील अत्यंत हृद्य भाग म्हणजे दुसरा विभाग—'कांही प्रात्यक्षिकें' हा ! या सदरांत लेखकाने विविध प्रसंगांचीं जीं पत्रें लिहून दाखविलीं आहेत तीं नमुने म्हणून होतकरू पत्रलेखकाला पुनःपुन्हा वाचण्याचा मोह व्हावा इतकीं तीं सरस वठलीं आहेत. तिसऱ्या विभागांत शिवाजी—औरंगजेब—बाजीराव यांच्यापासून पंडित नेहरू, श्री. ना. ग. गोरे यांनी लिहिलेलीं नऊ निवडक पत्रें नमुन्यादाखल सादर केलीं आहेत.

एकंदरींत ग्रंथाची भाषा ओघवती, प्रासादिक व लालित्यपूर्ण आहे. मात्र मधून मधून खटकतें तें बऱ्याच मुद्रणदोषांमुळे. लेखनांत अकारान्त शब्दांची बोलीभाषा व एकारान्त शब्दांची ग्रांथिक भाषा यांची जी मिसळ केली आहे ती करायला नको होती.

'अशुध्द पत्रलेखनामुळे बेरंग होतो' असें सांगून श्री. लिमये यांनी म. सा. परिषदेच्या शुद्धलेखनाचे सर्व नियम दिले आहेत. पण सदर ग्रंथांत नवी वा जुनी कोणतीच शुद्धलेखन-पद्धति अनुसरलेली नाही. हे किरकोळ दोष सहज टाळतां आले असते. ते त्यांनी पुढील आवृत्तींत कटाक्षाने टाळावेत. असो. पत्रलेखनशास्त्रावर असा अभिनव ग्रंथ लिहून मराठी साहित्यांतील उणीव भरून काढल्याबद्दल श्री. लिमये यांचें मनःपूर्वक अभिनंदन ! ● ● ●

मो. रा. वाळंबे

## 'यशवन्त'राव चव्हाण

आपल्या महाराष्ट्र राज्याचे मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या व्यक्तिमत्त्वाची व कार्याची थोडक्यांत ओळख या छोट्या ग्रंथांत करून देण्यांत आली आहे. गेल्या

**सप्रेम नमस्कार वि. वि.** (अर्थात् पत्रव्यवहारशास्त्र)–[ लेखक : श्री. अ. ह. लिमये, व्हीनस बुकस्टॉल, पुणें २. ]

**'यशवन्त'राव चव्हाण** – ( व्यक्ति व कार्य ) – [ लेखक : श्री. कृ भा. बाबर; प्रकाशक : श्री. ग. ल. ठोकळ, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें; पृष्ठें ८७, मूल्य दीड रुपया. ]

चारसष्ट वर्षांत महाराष्ट्रापुढे 'आ' वासून उभ्या असलेल्या अनेक समस्या श्री. यशवन्तरावांनी अत्यंत खेळीमेळीने व कौशल्याने हाताळल्या व समाधानकारक रीतीने सोडविल्या. निगर्वी व सौजन्यशील स्वभाव, खंबीर वृत्ति, ध्येयावरील अढळ निष्ठा, समतोल वृत्ति, विरोधकांबद्दलचा आदरभाव व राष्ट्रकार्याची तळमळ इत्यादि गुणांमुळे त्यांनी आज जनमनांत आपल्याबद्दल कसा आदर निर्माण केला आहे याचें सुरेख व धावतें विवेचन श्री.बाबर यांनी या छोटया पुस्तकांत केलें आहे. या पुस्तकांत व्यक्तीपेक्षा त्यांच्या कार्यावरच विशेषत्वाने भर देण्यांत आला आहे. त्यामुळे चरित्रनायकाचें घराणें, बाल्य, विद्यार्थिजीवन व खासगी जीवन याबद्दलची माहिती त्रोटक वाटते व ती थोड्या विस्ताराने ऐकण्याची इच्छा अतृप्त राहते.

'यशवन्तरावांचें आजचें स्थान' हें प्रकरण पुस्तकारंभीं देण्याऐवजी शेवटीं दिलें असतें तर अधिक उचित झालें असतें. 'संकटाशीं झगडा' व 'चालून आलेलें नेतृत्व' हीं दोन प्रकरणें विशेष रंगलीं आहेत. यशस्वी राज्यकारभाराचीं गमकें सांगून त्यांच्या निकषावर यशवन्तरावांचें यशहि पारखून दाखविण्यांत आलें आहे. प्रतापगडचा समारंभ, द्वैभाषिकाचा प्रश्न, विदर्भाचा प्रश्न यांचा उत्कृष्ट धावता आढावा घेऊन त्यांचें राजकारण-कौशल्य व 'विचार-दर्शन' या प्रकरणांत त्यांच्या भाषणांतील विचारसौंदर्य चांगल्या रीतीने पण थोडक्यांत मांडलें आहे. शुद्धलेखनाचा वाद आज मिटल्यानंतरहि या छोटया ग्रंथांतील लेखनशुद्धीकडे अधिक लक्ष पुरवावयास हवें होतें. पुस्तकाची छपाई उत्कृष्ट आहे; तथापि यांत चरित्रनायकाशीं घनिष्ठ संबंध आलेल्या व्यक्तींचीं कांही छायाचित्रें देतां आलीं असतीं तर अधिक बरें झालें असतें. ● ● ●

**मो. रा. वाळंबे**

## अनागोंदी अंदाधुंदी

आधुनिक लोकशाहीच्या काळांत केवळ आपले प्रतिनिधि निवडून देणें येवढेंच जनतेचें काम नसतें. सत्तारूढ पक्षातर्फे राज्यकारभार कसा चालला आहे आणि शासनव्यवस्था कितपत कार्यनिष्ठ आणि कार्यक्षम आहे याकडे लक्ष देणें हें निवडून आलेल्या लोकप्रतिनिधींचें कर्तव्य असतें. ह्यासाठी एस्टिमेट्स् कमिटी व पब्लिक अकौंट्स् कमिटी ह्या पार्लमेंटच्या समित्या आहेत. पार्लमेंटचे सभासद ह्या समित्यांवरील सभासद निवडतात. सरकारने योजलेल्या योजना व सार्वजनिक व्यवसाय ( पब्लिक अंडर्टेकिंग्ज ) यांची चिकित्सा व परीक्षण करणें हें एस्टिमेट्स् कमिटीचें मुख्य कार्यक्षेत्र आहे. पार्लमेंटने मंजूर केलेल्या रकमांचा खर्च योग्य प्रकारें व मंजुरी मिळालेल्या कामाकरिता झाला किंवा नाही, त्यांत अनाठाई, अवास्तव व असमर्थनीय खर्च झाला किंवा कसें हें तपासून पाहणें हें पब्लिक अकौंट्स् कमिटीचें मुख्यतः कार्यक्षेत्र असतें. ह्या दोन्ही समित्यांचे अहवाल शासनव्यवस्थेची कार्यक्षमता अजमाविण्याच्या दृष्टीने फार अभ्यास करण्यासारखे असतात; परंतु दुर्दैवाने फार थोडयांचें लक्ष ह्या अहवालां-

**अनागोंदी अंदाधुंदी** – [ लेखक : श्री. **श्री. रा. टिकेकर**; प्रस्तावना : **खासदार श्यामराव परुळेकर**; प्रकाशक : पी. पी. एच्. बुकस्टॉल, मुंबई ४; पृ. ८८, मूल्य ३ रु. ].

कडे जातें.प्रादेशिक भाषांतून अहवाल उपलब्ध नसल्यामुळे सामान्य लोकांना राज्यकारभारांतील अंदाधुंदी किती, कोठे व कशी चालली आहे हें लक्षांत येत नाही. अहवालाच्या प्रती कांहिजण मुद्दाम ‘ बंद कपाटांतहि ठेवून देतात.’

अशा सर्व अहवालांचें सविस्तर वाचन करून त्यांत मांडलेली सत्यस्थिति मराठी वाचकांच्यापुढे आणण्याचें केवळ कष्टसाध्य कार्य एक सिद्धहस्त टीकालेखक श्री.श्री.रा. टिकेकर ह्यांनी ‘ अनागोंदी अंदाधुंदी ’ या पुस्तकांत केलें आहे. विशेष म्हणजे लिखाणांत कोठेहि पूर्वग्रहदूषित किंवा अतिरंजित विस्तार न मांडतां, केवळ राज्यकारभारांतल्या अंदाधुंदीविषयक असलेली सत्यस्थिति मांडण्याची त्रयस्थ भूमिका त्यांनी घेतली आहे. कारभारांतील गैर-व्यवस्था लक्षांत आल्यावर सामान्य नागरिक या नात्याने आपली प्रतिक्रिया काय होते या-बद्दल महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांनी व्यक्त केलेल्या सात्त्विक संतापाचा लेखकाने केलेला उल्लेख औचित्यपूर्ण आहे. टिकेकरांनी या पुस्तकांत राउरकेला, भिलई व दुर्गापूर येथील सरकारी पोलाद-कारखान्यांच्या कारभारांतील गोंधळ तसेंच कॅनेडियन कंत्राट, जीप-मानगड, दंडकारण्य-वसाहत आणि कोळशाचा पुरवठा पुरेसा आणि वेळेवर होण्या-आड येणाऱ्या अडचणी आणि तत्संबंधीची बेपर्वाई याबाबत पुरावे व दाखले देऊन राज्य-कारभारांत अंदाधुंदीचें प्रमाण किती पराकोटीला पोहोचलें आहे याचें विवेचन पद्धतशीरपणें केलें आहे. सरकारी अंदाधुंदीची पानोपानीं आढळणारीं हीं उदाहरणें संताप आणि चीड आणणारीं आहेत. या उदाहरणांतून उद्वेग वाटण्याइतकी बेफिकिरी आणि शरमेने मान खाली घालावयाला लावणारी अधिकाऱ्यांची नालायकी आहे. आटलेली चांदी, फुकट गेलेल्या सहाशे स्कॉलरशिपा, खर्चखात्याचा भरमसाट खर्च, अक्कलखातीं केलेली उधळपट्टी, कंत्राटें देतांना केलेली धिसाडघाई आणि अधिकाऱ्यांनी लाचलुचपतीला दिलेलें उत्तेजन याविषयी लेखकाने केलेलें विदारक वर्णन अंगावर शहारे आणणारें आहे. खासदार परुळेकर यांनीहि एस्टिमेट्स् कमिटी आणि पब्लिक अकौंट्स् कमिटी या समित्यांच्या कार्यपद्धतीची माहिती व फलश्रुति फार समर्पक शब्दांत आपल्या प्रस्तावनेंत मांडली आहे. एरव्ही उपेक्षिलेले हे अहवाल सामान्य जनतेंत जागृति करण्यास आणि आपल्या विचारांना योग्य दिशा दाखवून चालना देण्यास फार आवश्यक आहेत. लोकशाहींत पक्षोपपक्षांच्या जाहीरनाम्यांपेक्षा कार्य-क्षमतेला आणि कार्यपद्धतीला जनता महत्त्व देतें हें कळलें तरच शासनव्यवस्था सुधारली जाईल आणि राज्यकर्त्यांना कारभारांत सुधारणा करावीशी वाटेल. टिकेकरांनी हें पुस्तक लिहून एक महत्त्वाची राजकीय गरज भागविण्याची मौल्यवान् कामगिरी पार पाडली आहे. इंग्रजींत जसे ए.डी. श्रॉफ किंवा गोरवाला परखडपणें व पोटतिडकीने टीकालेख लिहितात तीच कळकळ व तोच प्रामाणिक अभिनिवेश टिकेकरांच्या सर्व टीकालेखांतून प्रकर्षाने दिसून येतो. त्यांचे विचार विदारक असतात परंतु त्यांत कुत्सितपणा कोठेहि आढळत नाही हें विशेष. प्रादेशिक भाषांतून अशा प्रकारचें वाङ्मय मोठया प्रमाणावर येणें आवश्यक आहे. टिकेकरांची भाषा सरळ, सोपी व ओघवती आहे त्यामुळे कोठेहि बोजडपणा किंवा कंटाळवाणेपणा आढळून येत नाही. इंग्रजी शब्दांना अन्वर्थक असे योग्य ते पारिभाषिक शब्द अगदी सहजतेने बहुतेक सर्व ठिकाणीं वापरण्यांत आलेले आहेत. परिशिष्टांमध्ये दोन्ही समित्यांच्या अहवालांची यादी देऊन लेखकाने याबाबत अधिक वाचन करणाऱ्यांना फार सुंदर मार्गदर्शन केलें आहे. टिकेकरांचें याबद्दल निःसंशय अभिनंदन ! • • •

डॉ. प्र. चिं. शेजवलकर

## छत्रपति संभाजी महाराज यांचें चरित्र

सतराव्या शतकांतील महाराष्ट्राच्या सामाजिक स्थितीच्या पार्श्वभूमीवर संभाजीचें चरित्र रेखाटून त्यासंबंधी वाचकांस नवी दृष्टि प्राप्त करून देणारा हा ग्रंथ आहे. या ग्रंथाच्या वाचनाने बखर, कादंबऱ्या व नाटकें यांनी निर्माण केलेल्या संभाजीविषयक अपसमजुतींस धक्का बसेल. श्री. बेंद्रे यांच्या चार तपांच्या परिश्रमाची साक्ष पटविणारा हा ग्रंथ असून त्यांत संशोधनाचा बारकावा, घटनासंगतीची कसोशी व मूल्यमापनांतील विवेचकबुद्धि या तिहींची वाचकांस सारखीच प्रचीति येते. मराठी इतिहासाच्या संशोधनास गेल्या दहावीस वर्षांत फुटकळ, एकांडे व संकुचित दृष्टीचें वळण लागत चाललें आहे. नुसत्या किरकोळ टिप्पणांच्या चुटपुटत्या वाचनावर समाधान मानावें, राजवाडे किंवा दत्तोपंत आपटे यांच्याप्रमाणे ऐतिहासिक घटनेचें व्यापकदृष्टीने विवेचन करण्याची ताकदच असूं नये व आम्ही म्हणजे कोणी इस्से जादा आहोंत अशा दुरभिमानाने भारावून जावें असा प्रकार ठिकठिकाणीं आढळतो. श्री. बेंद्रे यांचा ग्रंथ यास अपवाद आहे. त्यांनी संशोधित साधनांचा संपूर्ण परामर्श घेऊन, संभाजी व त्याच्या भोवतालचा समाज यांचें चित्र रेखाटलें आहे; आणि हें सर्व करण्यांत त्यांना एवढें यश लाभलें आहे की, संभाजी महाराजांच्या हालअपेष्टा मृत्यूनंतर व त्यांनी अडीचशे वर्षें अपसमजांचें शल्य सोसल्यावर त्यांचें निवारण करणारा बेंद्रे यांच्यासारखा चरित्रकार लाभल्याबद्दल त्यांनाहि समाधान वाटावें अशा योग्यतेचा हा ग्रंथ आहे.

याप्रमाणे ग्रंथकाराच्या दीर्घकालीन परिश्रमाबद्दल आदराने मान लवविण्यांत प्रस्तुत लेखकास आनंद वाटत असला तरी ग्रंथांतील विधानांचें परीक्षण करून असेल तो मतभेद व्यक्त करण्याची टाळाटाळी तो करूं इच्छित नाही. आजपर्यंतच्या लेखकांनी संभाजीची अवहेलना केली. त्याच्या उलट टोकास श्री. बेंद्रे इतके गेले आहेत की, संभाजी हा शिवाजीपेक्षाहि थोर पुरुष होता असें त्यांना सुचवावयाचें आहे. पृ. ५० वर अब्रे करे याचा उतारा दिलेला आहे. त्यांतील वाक्य असें—' सैनिकांचें त्याच्यावर फार प्रेम आहे व ते त्याला शिवाजीसारखाच मान देतात. फरक इतकाच की, ह्या सैनिकांस संभाजीच्या हाताखाली लढण्यांत विशेष धन्यता वाटते. ' युवराज संभाजीचें कर्तृत्व वर्णन करीत असतां हा उतारा दिला असल्याने या वाक्याची जबाबदारी अब्रे करेवर टाकून श्री. बेंद्रे यांना सुटतां येणार नाही. पृ. १०८ वर शिवाजीबद्दल लिहितांना श्री. बेंद्रे म्हणतात—' ही तेढ ( ब्राह्मण व कायस्थ या दोन्ही जमातींतील ) उघड वाढण्यास शिवाजी महाराजांची ब्रह्मनिष्ठ व पापभिरु वृत्तीहि थोडीबहुत कारणी झाली. ' परंतु प्रभावलीच्या ब्राह्मण सुभेदाराला चापणारें शिवाजीचें इ.स. १६७५चें प्रसिद्ध पत्र श्री. बेंद्रे यांच्या चांगलें लक्षांत असल्यामुळे ते पृ. १०९ वर लागलीच म्हणतात, 'राज्याभिषेकाने धर्मशास्त्राप्रमाणे श्रेष्ठ वर्णासहि शिक्षा करण्याचा अधिकार मिळाल्याने शिवाजी महाराजांचें पुढे धोरण बदललें.' लेखकाचें हें स्पष्टीकरण शुद्ध वकिली थाटाचें आहे. कारण इ. स. १६७५ नंतरच्या काळांतहि अण्णाजी दत्तो या ब्राह्मण अधिकाऱ्याच्या श्री.बेंद्रे यांच्या मताप्रमाणे झालेल्या चुका शिवाजीस माहीत असूनहि इ.स. १६७६ सालीं कर्नाटकच्या स्वारीवर जातांना अण्णाजी दत्तोस राजधानींत रायरी येथे ठेवलें व आपला पुत्र संभाजी यास मात्र दूरचा

छत्रपति संभाजी महाराज यांचें चरित्र – [ लेखक व प्रकाशक : वा. सी. बेंद्रे, लेले यांचा बंगला, फर्ग्युसन कॉलेज रस्ता, पुणें ४; पृष्ठें ७२६, किं. १६ रु.]

शृंगारपूरचा सुभा सांगितला. याच प्रसंगासंबंधाने श्री. बेंद्रे पृ. ६६ वर लिहितात-'शिवाजी-राजे यांची ब्रह्मनिष्ठत्वाची हलुवार परंपरागत वृत्ति असल्या मंडळींना कठोर शासन देण्यास तयार होत नव्हती.' हें श्री. बेंद्रे यांचें म्हणणें खरें की पृ. १०९ वरील राज्याभिषेकोत्तर धोरण बदललें हें म्हणणें खरें ? श्री. बेंद्रे यांचें हें सर्वच लेखन शिवाजीचे दोष दाखविण्या-पेक्षा संभाजीचें अवास्तव समर्थन करण्याचा व सतराव्या शतकांत एका बाजूस ब्राह्मण व दुसऱ्या बाजूस कायस्थ व मराठे अशी तेढ होती हा त्यांचा नवा शोध आवर्जून सांगण्याचा त्यांचा उत्साह यामुळे झालेलें आहे. पृ. १०८ वर श्री. बेंद्रे यांनी म्हटलें आहे की, मोरो-पंतांनी आवजी चिटणिसाच्या कामाबद्दल महाराजांजवळ आक्षेप घेतला त्यावर महाराजांनी मोरोपंतास चोख उत्तर दिलें तें 'ऐकोन पंत खजिली होऊन तोंड झाकून घरास गेले की महाराजांनी आपले बुद्धीस दोष लाविला.' उत्तर पेशवाई काळांत लिहिल्या गेलेल्या एक्याण्णव कलमी बखरींतील हें वृत्त विश्वसनीय आहे असें घटकाभर गृहीत धरलें तरी त्यायोगे फार तर अधिकाऱ्यांचा एकमेकांबद्दल मत्सर होता असें ठरेल. पण तेवढ्यावरून जमाती-जमातींत तेढ होती असें कसें सिद्ध होतें हें कळत नाही. या कायस्थ पुराणाचा श्री. बेंद्रे यांनी कसा निष्कारण बडेजाव माजविला आहे तें पाहा. श्री. बेंद्रे म्हणतात, 'शिवाजी राजाच्या कारभारास प्रथम पुणें—इंदापूर भागांत सुरुवात झाली, तेथे साहजिकच ब्राह्मण लेखकवर्गाची योजना झाली. ही मंडळी आपले आप्तइष्टांना आपल्या हाताखाली घेऊन लेखकवर्गाची वाढती गरज भागवू लागली. त्यामुळे कारभार कांही कुटुंबांच्या हातीं गेल्याने त्यांचेवरील नियंत्रण ढिलें होऊ लागलें. पुढे राज्यक्षेत्र वाढतांच लेखकांची तूटहि अधिकाधिक भासू लागली ....... कायस्थ मंडळी ही समुद्रावरील कोंकण भागांत व मावळांत होती ....... कायस्थ मंडळी मावळ कोंकण प्रांतांतील देशमुख-देशपांड्यांबरोबर शिवाजी महाराजांकडे आली. त्यांचा उपयोग केल्यास राज्यकारभारांत **स्वामिनिष्ठा व सचोटी राखतां येईल** या उद्देशाने शिवाजी महाराजांनी कायस्थांना आपल्या कारभारांत घेण्याचें ठरविलें' (पृ. १०६). वर्तमानकाळांत अजूनहि क्वचित् रेंगाळत राहिलेलीं जातीय भुतें भूतकाळांत नाच-विण्याचा हा उद्योग अशास्त्रीय आहे असें इतिहासलेखकास वेळींच स्पष्ट सांगणें जरूर आहे. खरी गोष्ट अशी आहे की, त्या काळीं ब्राह्मण व कायस्थ दोघेहि लेखक, मुत्सद्दी व योद्धे म्हणून काम करीत. मराठे वर्गांत मात्र लेखनाचें काम कमी असल्यामुळे कारकुनी पेशा बव्हंशीं ब्राह्मण-कायस्थांच्या वांट्यास येत असे. शिवाजीने जमातीजमातींतील हीं विशिष्ट लक्षणें ओळखून प्रत्येकास त्याच्या लायकीप्रमाणे जागा दिल्या व तत्कालीन जातिभेदास श्रम-विभागाचें स्वरूप देऊन तो कारणीं लावून घेतला.

पण शिवाजीच्या योग्यतेसंबंधी किंवा जातीयवादाच्या भूतकालीन अस्तित्वासंबंधी श्री. बेंद्रे यांचे हे विचार क्षणभर बाजूस ठेवून चरित्रनायक संभाजी याच्यासंबंधी श्री. बेंद्रे यांनी उत्साहाच्या भरांत कशी अतिशयोक्ति केली आहे तें पाहूं. कोणाहि ऐतिहासिक पुरुषांत गुणदोष हे असणारच, तसे संभाजींतहि होते. इ. स. १६७८ सालीं संभाजी बापाविरुद्ध जाऊन मोगलांस मिळाला या त्याच्या कृत्याचें कांही झालें तरी समर्थन कसें करणार ? आणि चरित्रलेखकाने चरित्रनायकाच्या सर्वच कृत्यांचें समर्थन केलें पाहिजे हें निर्भेळ ऐति-हासिक विवेचनाच्या चौकटींत कसें बसूं शकेल ? पण नेमकें तेंच काम श्री. बेंद्रे यांनी अपुऱ्या आधारावर आपल्या अंगावर घेतलें व त्यांत ते घसरले आहेत. श्री. बेंद्रे म्हणतात,

संभाजी इ. स. १६७१ पासून राज्याचा कारभार पाहूं लागल्यापासून 'संभाजी राजाची वृत्ति कारभाऱ्यास किंचित् जाचक वाटूं लागली असल्यास नवल नाहीं' (पृ. ५३). 'जुने वृद्ध नोकर मातृहीन वडील मुलाजवळ नेकीने वागण्यास तितकेसे उद्युक्तहि होत नसतात...... अशा मंडळींना जशी स्वार्थापुढे स्वामीकार्याची चाड नसते तशीच ते **राजद्रोहांतील पापबुद्धीची फिकीरच धरीत नाहीत**...... जुन्या परनिष्ठ गुलामी संस्काराच्या व बुरसटलेल्या मनोवृत्तीच्या वृद्ध मंत्र्यांत हिंदवी स्वातंत्र्याच्या लालसेचा अभाव होता. (आणि तरीहि शिवाजीने त्यांचा त्याग केला नाहीं!)....... दुर्दैवाने संभाजी राजास आपल्या शेवटच्या दहा वर्षांच्या युवराजपदाच्या कालांत अशाच आपत्तीला तोंड देण्यांत शक्ति वेंचावी लागली' (पृ. ५४). श्री. बेंद्रे याच पृष्ठावर मोठा सिद्धान्त सांगण्याचा आव आणून लिहितात, 'सारांश क्रांतिकालांत जनता व त्यागपूर्ण पुढारी जितके कर्मनिष्ठ व ध्येयनिष्ठ असतात तितके हे स्वार्थावर लक्ष देऊन कार्याधिकारावर येणारे मंत्री नसतात. हा नेहमीचा अनुभव–(विद्यमान स्वराज्यांतील मंत्र्यांनो, ऐका हो ऐका)–स्वराज्याच्या इमारतीच्या उभारणीकालांतहि प्रत्ययास आला.' मंत्र्यांच्या या वृत्तीचें सविस्तर विवेचन केल्यावर श्री. बेंद्रे पृ. ७६ वर लिहितात, 'संभाजी महाराजांनी आपला बेत गुप्त ठेवून आपल्या मनस्तापापासून मुक्त होण्यासाठी शत्रूच्या गोटांत जाऊन तेथील धोका किंवा दगाफटका सहन करण्याची मनाची तयारी केली.' अनुपुराणांतील कांहीं उतारे देऊन श्री. बेंद्रे या प्रश्नाचा पुढीलप्रमाणे पृ. ७७ वर समारोप करतात, 'आपल्या जन्मसिद्ध व संस्कारपूर्ण युवराजपदाच्या सर्व सुखावर पाणी सोडून सन्माननीय (?) अशा नवीन जीवनाच्या शोधास केवळ स्वकर्तृत्वावर विसंबून प्रारंभ केला. निष्कारण अवमानाचे किंवा अवहेलनेचे मनावरील दुष्ट परिणाम प्रेमबंधनामुळे जर क्रूर सूडाचे भावनेंत अंकुरित होऊं न शकते तर ते अविचारी आत्मयज्ञांत रूपांतरित झाल्यावाचून राहात नाहीत.' एकूण श्री. बेंद्रे यांच्या मतें संभाजीचे मोगलांकडे जाणें हा एक आत्मयज्ञ आहे! अविचारी आत्मयज्ञ व स्वकर्तृत्वावर विसंबून नवीन जीवनाचा शोध या दोन गोष्टी एकत्र कशा बसतात तें श्री. बेंद्रे यांसच माहीत. खरी गोष्ट अशी की, संभाजीचे मोगलांकडे जाणें हा कसेंतरी नशीब काढण्याचा स्वार्थी अविचार होता. परंतु त्यांत स्वार्थाचाच यज्ञ होतो असें दिसतांच संभाजीने तो अविचार सोडून दिला व तो बापाकडे परत आला.

आतां संभाजीविरुद्ध मंत्र्यांनी काय तक्रार केली व ती कोणत्या आधारावर श्री. बेंद्रे यांनी उभारली आहे तें पाहूं. शिवाजी कर्नाटकचे स्वारीवर गेला असतां राज्याचा सर्व कारभार युवराज म्हणून संभाजीच्या हातीं देण्याऐवजी शिवाजीने त्यास शृंगारपूरचा सुभा पाहण्यास सांगितलें. तिकडून परत आल्यावर "शिवाजी महाराजांनी स्वहस्तें पत्र लिहून संभाजीस कळविलें की, 'तू प्रजेला अभय देतोस, पण प्रजा कर बुडवीत आहे. तूं आमात्यांचा उघड अपमान करीत आहेस. तरी शृंगारपुराहून तू उठून परली-सज्जनगडास जा.' नंतर शिवाजी महाराजांची आज्ञा शिरसा वंदून मानून संभाजी राजांनी आपलें प्रस्थान...परळीस हालवलें" (पृ. ७३-७४). येथेच त्याच्या मनस्तापाचा अतिरेक होऊन तो माहुलीस स्नानास जाण्याच्या निमित्ताने निघाला व मोगलांस जाऊन मिळाला. वरील वृत्तान्त वाचणाऱ्याच्या हें ध्यानांत येईल की, शिवाजीने सर्व हकीकत ऐकून मंत्र्यांच्या वर्तनांत कांहीं आक्षेप घेण्यापेक्षां संभाजीचा शृंगारपूरचा सुभा काढून घेऊन त्यास परळीस पाठविलें. अर्थात् शिवाजीच्या मतें चूक संभाजीची झाली हें उघड आहे. कोणी विचारील की 'तू प्रजेला अभय देतोस, पण प्रजा कर बुडवीत आहे' ही चूक कशी? त्यावर उत्तर हें की,

वरील सर्व लेखन अनुऱ्या आधारावर झालेलें आहे. कै. सरदेसाई यांनी संपादन करून प्रकाशित केलेल्या 'परमानंदकाव्यम्' या ग्रंथाच्या आधारावर—यासच अनुपुराण हें नांव आहे—संभाजीच्या चारित्राचा बहुतेक पूर्वार्ध श्री. बेंद्रे यांनी लिहिलेला आहे हें त्या ग्रंथांतील उतारेच्या उतारे संदर्भासह त्या भागांत दिले आहेत त्यावरून लक्षांत येईल. संभाजीचें चरित्र-लेखन करण्यास हें काव्य निखालस आधार मानण्याजोगें आहे का, हा संशोधनांतील महत्त्वाचा प्रश्न आहे व यावर इ. स. १९५३ सालीं एप्रिलच्या 'सह्याद्रि' मासिकांत श्री. यशवन्तराव फफे यांनी अतिशय मार्मिक व चिकित्सक चर्चा केली आहे. त्यांत त्यांनी सप्रमाण दाखविलें आहे की, तथाकथित 'परमानंदकाव्यम्' हें किंवा यांतील कोणताहि भाग शिवभारताचा लेखक कवीन्द्र परमानंद याचा नव्हे. त्यांतील कांही भाग दुसऱ्या कोणी त्याच्या नांवावर लिहिला व कांही भाग त्याच्या नातवाने लिहिला. परमानंदाहून अन्य असा हा लेखक दरबारी कवीप्रमाणे संभाजीला अपकर्षक होणार नाही असेंच कांहीतरी सजवून लिहिणार, अशा स्थितींत लेखक समकालीन असला तरी त्याने मांडलेली बाजू प्रत्यंतर पुराव्याच्या अभावीं एकतर्फी विधान म्हणून म्हणावें लागेल, आणि याच एकतर्फी पुराव्यावर श्री. बेंद्रे सर्वस्वीं विसंबले असल्याने त्यांनी शिवाजीच्या मंत्र्यांवर नाही नाही ते आरोप केले आहेत व त्यांचें समर्थन करण्यासाठी तात्त्विक विवेचनाचा बुरखा चढविलेला आहे. शिवाजीने ज्यांच्यावर भिस्त टाकून राज्य वाढविलें व ज्यांचा त्याने कधी त्यागहि केला नाही त्या मंत्र्यांना स्वार्थी, राजद्रोही, पापबुद्धीची फिकीर न करणारे अशीं विशेषणें लावण्यापूर्वी श्री. बेंद्रे यांनी थोडातरी विचार करावयास पाहिजे होता. श्री. बेंद्रे अनुपुराणावर विसंबले याचा अर्थ त्यांनी दुसरे आधार पाहिले नाहीत असा मात्र नव्हे. पण अनुपुराणांतील विचारसंगति विश्वासार्ह मानून त्यास उपोद्बलक होणारे इतर आधार त्यांच्या मनांत भरले व ते त्यांनी मांडले. परंतु अनुपुराणाचा लेखक हा समकालीन म्हणून विश्वास्य मानावयाचा तर समकालीन सभासद हा अविश्वास्य कसा ठरतो? त्याने संभाजीसंबंधाने लिहितांना त्यास 'फटकळ' तर म्हटलेंच आहे, पण भविष्यपद्धतीने लिहितांना तो 'ब्राह्मण हत्या करील, मराठे यास लष्करचे सरदारासहि मारील, धरील, इजत घेईल, थोर लोकांची चाल मोडील, कैफ खाईल, गांजा ओढील, इषकबाजी करील—इ' असें लिहिले आहे (शंकरराव जोशी संपादित सभासद बखर पृ. १०८ पाहा). श्री. सभासद हा राजारामाचा पक्षपाती म्हणून त्याचा पुरावा विश्वासार्ह नाही असें म्हणावयाचें तर अनुपुराणाचा लेखक तेवढा विश्वासार्ह कसा ठरतो? सभासदाचें एक असो, परंतु समर्थांनी संभाजीस उद्देशून लिहिलेलें एक ओवीबद्ध पत्र प्रसिद्ध आहे. त्यांत 'मागील अपराध क्षमावे। कारभारी हाती धरावे। सुखी करूनि सोडावे। कामाकडे ॥ १ ॥ श्रेष्ठी जे जे मेळविले। त्यासाठीं भांडत बैसले॥ तरी मग जाणावे फावले। गनीमासी ॥ २ ॥ ऐसे सहसा करू नये' वगैरे जो उपदेश केला आहे त्यावरून समर्थांच्या मतें तरी संभाजीच्या हातून कांही गैरवर्तन घडलें असलें पाहिजे असें अनुमान निघत नाही काय? याखेरीज समकालीन इंग्रज व डच कागदपत्रांतून संभाजीच्या दुर्वर्तनाचे बोभाटे असल्याचे उल्लेख कितीतरी दाखवितां येतील. इतिहाससंशोधन हा कधी न संपणारा विषय आहे. पण चरित्रकथनाची संगति लावू पाहणाराने जसे स्वतःस अनुकूल असतील तसे प्रतिकूलहि असतील ते पुरावे दृष्टीआड करतां कामा नये व जेथे संगति लागत नसेल तेथे संगति लागत नाही अशी प्रांजळ कबुली दिली पाहिजे. पण श्री. बेंद्रे यांना अनुपुराण सापडलें व त्यांनी शिवाजीच्या ब्राह्मणांशीं सहानुभूति असणाऱ्या वृत्तीचा संबंध ब्राह्मण मंत्र्यांकडे लावून ब्राह्मण-कायस्थ वाद कल्पून स्वार्थी अधिकारारूढ मंत्र्यांना राजद्रोहाचें पाप करण्याची संव

वाटत नाही असें तत्त्वज्ञान सांगून संभाजीच्या प्रत्येक कृत्याची तरफदारी केली आहे. ही वकिली होईल, पण इतिहासास हें मंजूर नाही असें स्पष्ट सांगणें जरूर आहे. अशी एकतर्फी वकिली न करतांहि संभाजीच्या चरित्राची संगत लावतां येते व संभाजीचें मोठेपणहि सिद्ध होतें आणि तेंहि मुख्यत: श्री. बेंद्रे यांनी केलेल्या परिश्रमपूर्वक अभ्यासाच्या आधाराने. कसें तें पाहा—

इ. स. १६७१ सालीं संभाजीस अधिकारप्राप्ति झाली. इ. स. १६७४ सालीं झालेल्या राज्याभिषेकसमारंभांत संभाजीचें युवराज म्हणून पटबंधन झालें व लवकरच गृहकलह सुरू झाले. संभाजी या वेळीं १७।१८ वर्षांचा होता. कर्नाटकच्या स्वारीवर निघतांना एकतर संभाजीकडे सर्व अधिकार देऊन मंत्र्यांना त्याच्या आज्ञेत वागावयास सांगण्याइतका संभाजीच्या कर्तृत्वाबद्दल शिवाजीस विश्वास वाटावयास पाहिजे होता. तो त्यास वाटला नाही, मग तें शिवाजीच्या पत्नीप्रेमामुळे असो किंवा संभाजीच्या कांही आज इतिहासास अस्सल पुराव्यावरून माहीत नसलेल्या पण शिवाजीस माहीत असलेल्या गैरवर्तनावरून असो. दोन्हीहि अनुमानांचा संभव स्वीकारण्यास इतिहासकाराने तयार असलें पाहिजे. कर्नाटकच्या स्वारीहून परत आल्यावर शिवाजीने राज्याच्या वांटणीचा विचार, सभासद म्हणतो त्याप्रमाणे, केला असेल किंवा नसेल, पण शिवाजीला संभाजीचें वर्तन पसंत न पडून त्यास त्याने परळीस जाण्यास सांगितलें. संभाजीचा कवि कलशाशीं स्नेह, कवि कलशाचें तंत्रविद्येतील पुण्य व देवीची भक्ति आणि शृंगारपुरीं सुरू झालेल्या शक्तिपूजेचें माहात्म्य या सर्व गोष्टी लक्षांत घेतां शिवाजी संभाजीवर कां रागावला व त्यास त्यांनी समर्थांकडे जायला कां सांगितलें याचा कांही बोध होतो. यानंतर संभाजी दिलेरखानाकडे गेला व एक वर्षाने परत आला तेव्हां शिवाजीने त्यास पन्हाळगडचा सुभा सांगितला. शिवाजीच्या मृत्यूनंतर मंत्र्यांना संभाजीबद्दल विश्वास न वाटून त्यांनी त्याच्याविरुद्ध कट रचला. त्यांत कांही मुत्सद्दी सामील झाले. परंतु लष्कराचा कल संभाजीकडे होता. या लढ्यांत संभाजीस जय मिळाला व त्याने कटांत सामील असलेल्यांस शिक्षा केली असली पाहिजे व कटवाल्यांनी पुन्हा अकबराबरोबर कारस्थान केल्याचा यत्न केल्यामुळे संभाजीस अनावर राग येणें व त्याने त्याच्याविरुद्ध गेलेल्यास कडक शासन करणें स्वाभाविक होतें. बापाच्या मृत्यूनंतर राज्यकारभाराची सूत्रें हातीं घेतांच संभाजी हा पूर्ण जबाबदारीने वागला व औरंगजेबास त्याने यशस्वी रीतीने तोंड दिलें. त्यास कांही चैनीच्या सवयी लागल्या असतील तर त्या त्याने आपल्या राज्यकारभारविषयक जबाबदारीच्या आड येऊं दिल्या नाहीत. उपलब्ध अनुकूल व प्रतिकूल, परंतु विश्वासार्ह साधनांची दखल घेऊन संभाजीच्या चरित्राची संगति वर सांगितल्याप्रमाणे लावतां येते. यांत संभाजीचें चरित्र एखाद्या संभाजीच्या अभिमान्यास पाहिजे तेवढें भव्य व उदात्त असें रंगवितां येत नाही. परंतु संभाजीच्या परिस्थितींत असलेल्या माणसाच्या विचारविकारांशीं सुसंगत असें आहे. श्री. बेंद्रे हे शिवाजीच्या मंत्र्यांवर किती रागावले आहेत याचें एक मजेदार उदाहरण देतों. वर उल्लेख केलेल्या पृ. ७३–७४ वरील 'तू प्रजेला अभय देतोस पण प्रजा कर बुडवते आहे' इत्यादि अनुपुराणावर आधारलेल्या शब्दावर टीपा देतांना श्री. बेंद्रे यांनी राजापूरच्या इंग्रज वखारवाल्यांच्या पत्रव्यवहारांतील पुढील उतारा उद्धृत केला आहे. 'या महिन्याच्या २८ व्या तारखेस आनाजी पंडिताने येथून नजीकच असलेल्या देवस्थानच्या उत्सवासाठी २०,००० ब्राह्मणांना भोजन दिलें.' हा उतारा देऊन श्री. बेंद्रे लिहितात, 'मंत्र्यांना इतका खर्च करण्यास सवड असावी व बिचाऱ्या युवराजाला प्रजेला सूट देणें म्हणजे दुर्मंत्र्यांच्या मतें पाप वाटल्यास नवल तें कसलें!'

अनुपुराणासारख्या राजभाटाच्या विधानावर विश्वास ठेवून अनाजी पंडितास फटकारा मारण्याची श्री. बेंद्रे यांनी जी संधि साधली ती त्यांच्या बिनतोल मनोवृत्तीच्या लेखनाचें उदाहरण म्हणून दाखविण्यास पुरें आहे. असो.

प्रस्तुत ग्रंथाचें वाचन करीत असतां आणखी एक जी गोष्ट खटकते ती ही की, संभाजीच्या छोट्या कारकीर्दीतील इ. स. १६८५ नंतरच्या कालांतील घटनांची पुरेशी समाधानकारक माहिती मिळत नाही. आपल्या कारकीर्दीचीं पाहिलीं चारपांच वर्षे मोंगलांशीं झगडणारा संभाजी, मोंगलांचा मोर्चा विजापूर-गोवळकोंड्याकडे गेल्यावर काय करीत होता ? इ.स. १६८६ च्या सप्टेंबरांत आदिलशाही बुडाली तेथपर्यंत आदिलशाहीला साथ देण्यांत व मोगल-पिछाडीवर हल्ला करण्यांत तो गुंतला असल्याची कांहीशी माहिती मिळते. पण इ. स. १६८६च्या सप्टेंबरपासूनच्या पुढील दोन वर्षांतील माहिती संकलितपणें लक्षांत घेतां संभाजीच्या हालचाली त्याच्या कारकीर्दीच्या पूर्वार्धातील धडाडीस साजेशा नाहीत. इतिहास-लेखकाने विशेषतः संशोधकाने केलेल्या संशोधनाचें फलित सांगतांना जर कांही अज्ञात भागावर प्रकाश पडत नसेल, कोठे अधिक संशोधन करणें जरूर असेल, अमुक माहिती मिळत नसेल तर तसें प्रांजळपणें सांगणें जरूर आहे. तसें श्री. बेंद्रे यांच्याकडून झालेलें आढळत नाही. याच अनुषंगाने लिहावयाचें तें हें की, संभाजीचें संस्कृत भाषेंतील जें दानपत्र त्यांनी आपल्या 'साधना-चिकित्सा' ग्रंथांत दिलेलें आहे त्याचा संदर्भ या ग्रंथांत कोठेहि सापडत नाही. लेखकाने एका प्रसंगीं केलेला उल्लेख पुढे त्यास विश्वासार्ह वाटला किंवा न वाटला तर तें त्याने पुढच्या मोठ्या ग्रंथांत प्रांजळपणें मांडावें अशी अभ्यासकाची साहाजिकच अपेक्षा असते.

वर लिहिलेंच आहे की, इतिहाससंशोधन हा न संपणारा विषय आहे. पण त्यांत आयुष्य खर्ची घालून दीर्घ अभ्यासाने आपल्या विषयाची पुनः मांडणी करणें अभ्यासाच्या प्रगतीस नेहमीच अवश्य असतें. श्री. बेंद्रे यांनी अनुपुराणावर अवास्तव विश्वास ठेवल्याने त्यांनी केलेलीं विधानें वादाई असलीं तरी त्यांची तपश्चर्या वादातीत व आदरणीय आहे. फार वर्षांत प्रचंड परिश्रमाचें फल दर्शविणारें असें ऐतिहासिक विषयावरील पुस्तक मराठींत झालें नव्हतें. तें श्री. बेंद्रे यांच्या परिश्रमाने प्राप्त झालें. इतिहासाचे अभ्यासक तरी श्री. बेंद्रे यांचा ग्रंथ आधाशीपणें वाचतील व त्यांच्याशीं मतभेद व्यक्त केला तरी त्यांच्या उद्योगाबद्दल आदरभाव बाळगतील यांत शंका नाही. ● ● ●

रा. वि. ओतुरकर

# परिषद्वार्ता

( दि. ८ जानेवारी १९६१ पर्यंतची )

( चिटणिसांकडून )

**स्मृतिदिनः**—कै. माधव जूलियन ( माधवराव पटवर्धन) यांचा स्मृतिदिन मंगळवार दि. २९ नोव्हेंबरला साजरा झाला. या प्रसंगीं प्रा. डॉ. सौ. उषा पोतदार यांचें ' कवि माधव ज्यूलियन–एक अभ्यास ' या विषयावर सुश्राव्य व्याख्यान झालें. दि. ७ डिसेंबरला कै. भास्करराव तांबे यांच्या स्मृतिदिनीं प्रा. भीमराव कुलकर्णी यांनी ' कै. तांबे यांच्या काव्याचें स्वरूप ' या विषयावर व्याख्यान दिलें. या व्याख्यानाच्या वेळीं स. प. महाविद्यालयांतील कांही विद्यार्थि–विद्यार्थिनींनी कै. तांबे यांच्या निवडक कविता गाऊन दाखविल्या.

**महाराष्ट्र कवि यशवन्त यांचा सत्कारः**—राजकवि यशवन्त यांच्या काव्यतपश्चर्येबद्दल महाराष्ट्र सरकारने त्यांना 'महाराष्ट्र कवि' ही पदवी व मासिक मानवेतन देऊन गौरविल्याबद्दल कवि यशवन्त यांचा सत्कार व महाराष्ट्र सरकारचें अभिनंदन असा कार्यक्रम श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेने रविवार दि. ९ ऑक्टोबरला योजण्यांत आला होता. सदर प्रसंगीं प्रा. श्री. के. क्षीरसागर, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. भीमराव कुलकर्णी, श्री. प्र. ल. गावडे, श्री. बा. भ. बोरकर, प्रा. गिरीश यांचीं गुणगौरवपर भाषणें झालीं. सभेने महाराष्ट्र सरकारचें अभिनंदन करणारा ठरावहि शेवटीं संमत केला. तो सरकारकडे पाठविण्यांत आला.

**भेटीगाठीः**—नागपूरचे कांही पत्रकार कोयना-योजनेच्या पाहणी निमित्ताने पुण्याला आले असतां ८ ऑक्टोबरला परिषदेंत त्यांचें स्वागत करण्यांत आलें. त्या वेळीं श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. शैलेंद्रकुमार, श्री. सत्यपाल पटाईत, श्री. एस्. पी. बानर्जी, श्री. मु. प. भिशीकर, श्री. ना. त्र्यं. दामले, श्री. पु. दि. ढवळे हे पत्रकार व पुण्याचे प्रसिद्धिअधिकारी श्री. श्री. म. गोखले उपस्थित होते.

साहित्य अकादमी ( दिल्ली ) या संस्थेच्या मराठी सल्लागार मंडळाची बैठक ७ जानेवारीला पुणें येथे भरली होती. या संधीचा लाभ घेऊन परिषदेने मंडळाच्या सर्व सदस्यांना परिषदेला भेट देण्याची विनंती केली. त्यानुसार प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे, श्री. मामा वरेरकर, डॉ. वि. भि. कोलते, प्रा. पु. शि. रेगे, प्रा. अनंत काणेकर, प्रा.मं. वि. राजाध्यक्ष, प्रा. दि. के. बेडेकर व श्री. आर. एस्. केळकर ( कार्यवाह ) यांनी दिनांक ७ जानेवारीला सायंकाळीं परिषदेस भेट दिली. या प्रसंगीं प्रा. रा. श्री. जोग, श्री. य. दि. पेंढरकर, प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. के. ना. वाटवे, श्री. वा. रा. ढवळे इत्यादि परिषदेचे कार्यकर्ते, तसेच श्री. वि. द. घाटे, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. चिं. वि. जोशी, प्रा. अ. गं. मंगरूळकर, श्री. द. रा. गोमकाळे, सौ. संजीवनी मराठे, प्रा. सौ. उषा पोतदार, प्रा. मालती किर्लोस्कर इत्यादि साहित्यिक मंडळीहि उपस्थित होती. कांही साहित्यविषयक प्रश्नांवर चर्चा आणि साहित्य अकादमीच्या कामकाजाबद्दल निवेदन झाल्यावर मंडळाच्या सदस्यांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यांत आला.

अनुक्रमणिका

**कोशकार कै. कर्वे–दुखवटाः**—कोशकार व परिषदेचे खजिनदार श्री. चिं. ग. कर्वे यांच्या दुःखद निधनानिमित्त ६ जानेवारीला परिषदेतर्फे म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेने दुखवटा-सभा झाली. सभेंत कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर, प्रा. चिं. वि. जोशी, श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, श्री. वि. उ. वैद्य, श्री. बा. रा. कोल्हटकर, श्रीमती नातू यांचीं दुखवटा व्यक्त करणारीं भाषणें झालीं. सर्वांनी उभे राहून दुखवटा व्यक्त केल्यावर सभा समाप्त झाली.

**जांभेकर पारितोषिकः**—लोकशिक्षणकार श्री. ग. गं. जांभेकर यांनी आपल्या आईवडिलांच्या स्मरणार्थ परिषदेच्या आचार्य परीक्षेसाठी कांही अटींवर एक पारितोषिक देण्याचें ठरविलें असून त्यासाठी १२५० रु. ची रक्कम परिषदेकडे देऊं केली आहे. या रकमेच्या व्याजांतून पारितोषिक दिलें जाणार आहे. परिषदेने श्री. जांभेकर यांच्या देणगीचा साभार स्वीकार केला आहे.

**कार्यालयीन सभाः**—परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा ८ जानेवारीला भरली होती. श्री. श्री. बा. जोग, श्री. चिं. ग. कर्वे व श्री. ना. धों. ताम्हनकर यांच्या निधनाबद्दल दुखवटा व्यक्त करण्यांत आला. साहित्य-संस्था-संघीकरण योजनेनुसार स्थापन व्हावयाच्या मराठी महामंडळावर परिषदेतर्फे म. म. प्रा. द. वा. पोतदार, प्रा. श्री. के. क्षीरसागर व श्री. श्री. शं. नवरे यांची नियुक्ति करण्यांत आली. संघीकरण योजनेच्या वाटचालीबरोबरच परिषदेच्या घटनेंतहि योग्य तो बदल करावा लागणार आहे. या दृष्टीने हा बदल सुचवून घटनेचा एक नवा खर्डा तयार करण्यासाठी म. म. प्रा. पोतदार, श्री. श्री. शं. नवरे व श्री. वि. त्र्यं. शेटे यांची एक पोटसमिति नियुक्त करण्यांत आली. महाराष्ट्र-राज्य सरकारने 'साहित्य व संस्कृति मंडळा'ची स्थापना केल्याबद्दल समाधान व्यक्त करण्यांत येऊन सरकारचें अभिनंदन करण्यांत आलें.

---

## साहित्यवार्ता

( १ ) **मराठवाडा साहित्य संमेलनाचें ९ वें अधिवेशन** औरंगाबाद येथे दि. २१ व २२ जानेवारी १९६१ रोजीं भरणार आहे. श्री. म. भि. चिटणीस हे स्वागताध्यक्ष असून, अध्यक्षपदीं मराठवाडा साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष व एक थोर संशोधक श्री. न. शे. पोहनेरकर यांची नियुक्ति झाली आहे. ( २ ) **वडोदा येथील मराठी वाङ्मय-परिषदेचें ३६ वें अधिवेशन** दि. २१-२२-२३ जानेवारीला श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेखाली भरणार असून या प्रसंगीं महाराष्ट्रकवि यशवन्त यांच्या अध्यक्षतेने एक कविसंमेलनहि भरणार आहे.

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| १ | मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर ) <br> ले. कै. वा. अ. भिडे ( प्रती शिल्लक नाहीत. ) | |
| २ | म. सा. परिषद् - इतिहास <br> ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार | रु. न.पै <br> ३=०० |
| ३ | संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति <br> ले. प्रा. गं. बा. सरदार | २=०० |
| ४ | वाङ्मय-समालोचन ( १९४७ ) | २=०० |
| ५ | वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) | ३=०० |
| ६ | निबंध-विकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) | २=५० |
| ७ | साहित्य-सुगंध ( प्रवेश ,, ,, ) | २=५० |
| ८ | सारस्वत-प्रवेश ( प्रथमा ,, ,, ) | २=०० |
| ९ | शुद्धलेखन-नियम ( १९५९-नवी आवृत्ति ) | ०=१५ |
| १० | गुजराती वाङ्मय समालोचन ( १९५९ ) | १=०० |
| ११ | हिंदी वाङ्मय समालोचन ( ,, ) | १=०० |

( क्र. ३ व ५ या पुस्तकांची मागणी अनुक्रमें व्हीनस बुक-स्टॉल, पुणें २ व प्रसाद-प्रकाशन, सदाशिव, पुणें २ यांच्याकडे करावी. )

इतर चौकशी:-चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

**कार्यालयाच्या वेळा**

सकाळीं ...... ८॥ ते १०॥

दुपारीं ...... ४ ते ८

दर मंगळवारीं सुट्टी

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १५७५।२ सदाशिव पेठ, पुणें २.
प्रकाशकः— चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.